॥ वंदे मातरम् ॥

# संगीत

# रणदुंदुभि नाटक.

---


लेखक

वामन गोपाळ जोशी

सं. राक्षसी महत्त्वाकांक्षा, सं. सुडाचा संदेश, सं. न्यायाचा दरबार इ. नाटकांचे कर्ते.



आवृत्ति दुसरी

---

१९३०

किंमत सव्वा रुपया

# प्रस्तावना.

माझें पहिलें नाटक **संगीत राक्षसी महत्त्वाकांक्षा** रंगभूमीवर आल्यानंतर आज तेरा वर्षांनीं हें दुसरें नाटक बाहेर पडत आहे. एवढ्या दीर्घ कालावधींत नाट्यदेवतेच्या कृपेस पात्र झालेल्या एखाद्या प्रतिभासंपन्न नाटककारानें अनेक सुंदर नाटकें निर्माण करून मराठी रंगभूमीची अमूल्य सेवा केली असती. दुर्दैवानें मला हें भाग्य लाभलें नाहीं. तथापि त्याबद्दल चित्तास विषाद वाटूं न देतां ही माझी नूतन नाट्यकृति मी महाराष्ट्र रसिकांस नम्रपणें अर्पण करीत आहें. नाटकाचा विषय व संविधानक अगदीं सरळ व साधें असल्यामुळें त्याविषयीं विशेष खुलासा करण्याच्या भानगडींत मी पडूं इच्छित नाहीं. गुणदोषांची चर्चा नाट्यप्रेमी रसिक करतीलच. माझ्या पहिल्या कृतीप्रमाणें ही दुसरी कृतिही दोषपूर्ण असली तरी सहृदय वाचक ती उदार मनानें गोड करून घेतील असा मला दृढविश्वास आहे.

हें नाटक रंगभूमीवर आणण्याचेंच काय पण लिहविण्याचेंही सर्व श्रेय **बलवंत संगीत मंडळीचे** मालक **मि. रा. रा. चिंतामणराव कोल्हटकर, संगीतरत्न मास्टर दिनानाथ** व **मि. रा. रा. कृष्णराव कोल्हापुरे** यांच्याकडे आहे. यांच्या प्रेमाग्रहाच्या अभावीं हें नाटक जन्मास आले असतें किंवा नाहीं याची वानवाच आहे. तेव्हां त्यांचे मला प्रथम आभार मानिले पाहिजेत.

संगीत नाट्यरचनेस मधुर चालींची अत्यावश्यकता असल्यामुळें व या बाबतींत मला बिलकूल ज्ञान नसल्यामुळें **गायनाचार्य रा. रा. रामकृष्णबुवा वझे** यांचें जें मला निरपेक्ष साहाय्य झालें तें तर केवळ अमोलच आहे, व त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें.

नाटक प्रयोगरूपानें रंगभूमीवर आणण्याच्या कामीं **बलवंत संगीत मंडळीं**तील नटवर्गानें व इतर सहकारी मंडळीनें जी आस्था व जें प्रेम दाखविलें त्याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे. त्याचप्रमाणें पुस्तकांत घालण्यासाठीं सुबक छायाचित्रें काढून दिल्याबद्दल मुंबईतील सुप्रसिद्ध फोटोग्राफर **रा. रा. अनंतराव राजाध्यक्ष,** आणि मुद्रणाची व प्रकाशनाची

सर्व जबाबदारी शिरावर घेऊन ती उत्कृष्ट प्रकारें पार पाडल्याबद्दल **श्रीगणेश प्रिंटिंग वर्क्सचे** सेक्रेटरी, **रा. गणपतराव गोखले** व **श्रीसरस्वती मंडळाचे** सेक्रेटरी **रा. रा. बाबूराव रानडे** यांचेही मी मनःपूर्वक आभार मानतों. याशिवाय मार्मिक सूचना करून ज्या अनेक जिव्हाळ्याच्या मित्रांनीं मला वेळोवेळीं मोठ्या प्रेमानें मदत केली त्यांचाही मी आभारी आहे.

मुंबई, गुरुवार ता. ११ फेब्रुवारी १९२७ इ.

**वामन गोपाळ जोशी**
ग्रंथकर्ता.



॥ वन्दे मातरम् ॥

संगीत

# रणदुंदुभि

## नाटक.



### मंगलाचरण.



पद १—हमीर–चौताल. " मघ बोले "–

नमन हें काला मंगला ॥ माया–मूल जो;
महाविशाल सदा दावि नाट्यलीला ॥ध्रु०॥
भवाधार भाव थोर ॥ संहार हा घोर ॥
रंगवी जो । सारें हें इंद्रजाल ॥ १ ॥

---



# अंक पहिला.



## प्रवेश पहिला.

**स्थळः**—कदंबाधिपति राजा कंदर्प याचें रतिविलासमंदिर.

( राजा कंदर्प, सौदामिनी, शिशुपाल, पशुपाल वगैरे मंडळी नाचरंग व मद्यपान यांत गर्क झालेली आहेत. नृत्यगायन चालू असतां पडदा उघडतो ).

**नर्तकी:**—( गात व नाचत )—

२ पद—" कैसी शरमकी है बात० "—

**ही सखि राधा खेळे शृंगार ॥ ध्रु० ॥**
**लचकोनि चाले । वेलीच हाले ॥ उडवी बहारीबहार ॥**
**मुरडोनि डोळे । हृदयीं स्मराची ॥ मारी विषारी कटयार ॥ १ ॥**

( नृत्यगायन थांबतें ).

**सौदामिनी:**—( नृत्यगायन थांबल्यावर ) अहाहा ! नृत्यगायनाला आज काय बहारीचा रंग चढला आहे ! रंगदेवतेनें आज जणूं काय आपल्या रंगेल धनदौलतीची बेगुमान उधळपट्टीच चालविली आहे !

**कंदर्पः**—खरोखरच उधळपट्टी चालविली आहे ! अशी बहार आपण जन्मांत कधीं पाहिली नाहीं ! सारा मजाच मजा उडून गेला आहे ! शृंगार-सरोवरांत बुचकळ्या देऊन देऊन या रंगेल छबेल्यांनीं आज आमचा जीव कसा कामज्वरानें बेदम हैराण करून टाकिला आहे !

**पशुपालः**—असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ म्हणतात ती हीच ! भोलेनाथ !

**कंदर्पः**—अहाहा ! खरोखर या वेळीं तेजस्विनी येथें असती तर काय बहार झाली असती !

**सौदामिनीः**—झाली तेजस्विनीची आठवण ! मला वाटलें होतें चार दिवस तरी आपण बोलल्याप्रमाणें वागाल ! पण चार दिवस तर राहोतच; पण चार प्रहरसुद्धां आपल्याला धीर निघाला नाहीं.

**कंदर्पः**—प्रेमकलहांचें हें असेंच चालावयाचें ! इष्काच्या प्याल्यांतील वादळें अशीं क्षणभंगुरच असावयाचीं !—

३ पद—मांड—त्रिताल. " बालम सैय्या छेडोना० "—

**कोमल वातें । हालत डोलत ॥ प्रीति—सुर—लता ॥ ध्रु० ॥**
**कलह—कुतुहलें दावि रसाला ॥ नर्तनलीला ॥ काम—विलसिता ॥१॥**

**पशुपालः**—अगदीं बरोबर ! तेरड्याचा रंग तीनच दिवस टिकावयाचा ! भोलेनाथ !

**कंदर्पः**—मला वाटतें तेजस्विनीला बोलावणें पाठवावें.

**सौदामिनीः**—कांहीं नको. तिच्या येण्यानें फायदा तर कांहीं व्हावयाचा नाहींच; पण उलट रंगाचा बदरंग मात्र होईल !

**शिशुपालः**—अगदी बरोबर. तेजस्विनी ताईसाहेबांना विलासरंगाची लज्जत आहे कोठें ?

**कंदर्पः**—विलासरंगाची लज्जत नाहीं ! मग बायकोच्या जन्माला फुकटच आली वाटतें ?

**शिशुपालः**— नुसतें बायकोच्या जन्माला येऊन उपयोग काय ? जन्माला आल्यासारखा बायकीपणांतच जन्म घालविला पाहिजे. त्यांच्या अंगांत बायकांचा बायकीपणा तर नाहींच; पण तुम्हां आम्हां पुरुषांचा बायकीपणासुद्धां नाहीं ! त्यांचा म्हणजे सारा कोरडा ठणठणीत शुष्क कारभार ! या वेळीं त्या जर येथें आल्या तर नृत्यगायनाऐवजीं वादविवादाचीच दंगल उडवून देतील !

**पशुपालः**—बरोबर—अगदीं बरोबर ! तेजस्विनीबाईंना महाराजांचा तहाचा विचार बिलकुल पसंत पडावयाचा नाहीं आणि त्या येथें लढाईचें थैमान करून सोडतील. त्यांचा सारा मर्दानी खाका ! महाराजांचें व त्यांचें लग्न त्यांच्या वडिलांनींच ठरवून ठेविलें आहे म्हणून ठीक आहे. नाहींतर

माझी पक्की खात्री आहे कीं त्यांनीं पुरुषाऐवजीं एखाद्या बायकोशींच लग्न लावलें असतें! भोलेनाथ!

**कंदर्पः**—ठीक आहे. राहिलें. तुम्ही सारेच विरुद्ध आहांत तर आम्ही नाहीं तिला बोलावणें पाठवीत. चला-करा पुनः प्रारंभ. राज्यकारभाराची दगदग उद्यांपासून कायमची पाठीची सुटणार या आनंदानें आज आमचा दिल बडा खुषींत आहे. तेव्हां आज अगदीं बेछूटपणानें काम चालूं द्या. तुफानी वादळानें खवळलेल्या दर्याप्रमाणें आज येथें शृंगाराचा हलकल्लोळ माजून गेला पाहिजे. आज येथें सर्वांना पूर्ण पानस्वातत्र्य आणि विलास-स्वातंत्र्य आम्हीं बहाल केले आहे!

**पशुपालः**—वाहवा! आतां मात्र खरी बहार येणार! आधींच उल्हास त्यांत फाल्गुन मास! भोलेनाथ! चला. आणा दारू!—( मद्यपानास सुरवात होते. इतक्यांत सेवक लगबगीनें प्रवेश करतो ).

**सेवकः**—( घाबऱ्या स्वरानें ) सरकार-सरकार-तेजस्विनी ताईसाहेबांची स्वारी आली.—

**सौदामिनीः**—( दचकून ) काय? तेजस्विनी आली!

**सेवकः**—होय सरकार,—

**कंदर्पः**—कोठें आहे?

**सेवकः**—विलासमंदिराच्या दारावर मीं त्यांना अडवून ठेविलें आहे.

**कंदर्पः**—अडवून ठेविलें आहे? पागल-जा तिला एकदम इकडे घेऊन ये.-चल उचल पाय.—

**सौदा०:**—थांब. तिला इकडे आणूं नकोस.-परत घालवून दे.

**कं०:**—कां? परत कां घालवून दे?

**सौदा०:**—यावेळीं तिची ब्याद आम्हांला येथें नको आहे.—

**तेज०:**—( एकदम प्रवेश करून ) नको म्हणून काय उपयोग? तुझी ब्याद महाराजांच्या पाठीस लागली आहे तोंवर माझी ब्याद तुझ्या पाठीची सुटणें शक्य नाहीं. महाराज, आपण हा काय प्रकार मांडला आहे?

**कं०:**—कांही नाहीं. मामुली गोष्टी चालल्या आहेत.

**तेज०:**—मामुली गोष्टी! महाराज, आजचा प्रसंग मामुली आहे काय? "राज्य पदरांत टाका; नाहींतर युद्धाला उभे राहा" असा उद्दामपणाचा निर्वाणीचा खलिता मातंगेश्वरानें आपणांस पाठविला आहे. पण त्याला तसाच खडखडीत जबाब देण्याच्या उद्योगाला न लागतां आपण नाचरंगांत गर्क झाला आहांत. मामुली गोष्टी मामुली प्रसंगाला शोभतात; निर्वाणीच्या प्रसंगाला शोभत नाहींत. निर्वाणीच्या वेळी निर्वाणीच्याच गोष्टी केल्या पाहिजेत. कादंबांच्या तलवारीच्या धाकानें ज्यानें आजवर कदंबाधिपतीच्या पायांवर अनेकवार लोटांगणें घातलीं, त्या एका क्षुद्र संस्थानिकानें उन्मत्तपणानें आपल्याला युद्धाचें आव्हान द्यावें म्हणजे हा कांहीं मामुली प्रसंग नाहीं–हा निर्वाणीचा प्रसंग आहे.

**कं०:**–कबूल–तुझें म्हणणें मला सर्वस्वी कबूल आहे. आणि खरें विचारशील तर या अपमानाचा बदला कसा घ्यावा याच विचारांत आम्ही गुंगलों आहोंत.

**तेज०:**—काय? याच विचारांत आपण गुंतला आहांत! महाराज, मला काय आपण दूधपितें पोर समजतां? हे रतिविलालमंदिर म्हणजे हा काय खलबतखाना आहे? या हलकट नाटकशाळा–हे पाजी खुषमस्करे–या रंगेल बाईसाहेब हें काय दरबारचें मंत्रिमंडळ आहे? बेसुमार मद्यपान आणि बेफान नाचरंग हें काय गुप्त खलबत आहे? खरोखर, शत्रूच्या युद्धाच्या आव्हानाचा विचार करण्याची ही मुलुखावेगळीच तऱ्हा दिसते.

**सौदा०:**—शत्रूच्या आव्हानाला युद्धाची तयारी हाच का एक बिनतोड जबाब आहे?

**तेज०:**—होय. युद्धाच्या आव्हानाला युद्धाचा डंका हाच एक बिनतोड जबाब आहे.

**शिशु०:**—तर मग सामदामादि उपाय शास्त्रांत सांगितले आहे ते काय सारे फुकटच आहेत?

**तेज०:**—अलबत्, मातंगेश्वरासारख्या उन्मत्ताच्या आव्हानाला सामदामाचे उपाय निःसंशय फुकटच आहे.—

**४ पद—" वैभवें नटल्या जयाच्या०"—**

**दुर्मदें भरल्या अरीच्या गर्वभारा हराया ॥**

**प्रबल हा डंका रणाचा एक लोकीं खरा या ॥ धृ० ॥**
**मृदुल-मधुरा विनयवाणी । भव्य खाणी धनाच्या ॥**
**फोल सारा हा पसारा । अधम-हृदय धराया ॥ १ ॥**
**हृदय बनलें कठिणतेचें । प्रस्तराचें खलाचें ।**
**खड्ग-धारा वज्र साचें । चूर्ण त्याचें कराया ॥ २ ॥**

**कं०:**—कबूल—तुझें सारें म्हणणें मला कबूल आहे. पण ही चर्चा करण्याचें हें स्थळ आणि हा काळ आहे का ?

**तेज०:**—स्थळ हें नसलें तरी काळ हाच आहे. शत्रु सरहद्दीवर येऊन दाखल झाला आहे आणि आपल्या जबाबाची उत्सुकतेनें वाट पाहत आहे. तेव्हां त्याच्या प्रतिकाराच्या तयारीला आपण आतांपासूनच लागलें पाहिजे.

**पशु०:**—ताईसाहेब, बोलतों याची माफी असावी. तलवारीचा जबाब तलवारीनेंच द्यावा लागेल अशा गैरसमजुतीनें आपलें हें सारें जोरदार व्याख्यान चाललें आहे. पण महाराजांचा विचार कांहीं तलवारीला तलवारीचा जबाब देण्याचा नाहीं त्यांनीं आणि त्यांच्या मंत्रिमंडळानें मातंगेश्वरांची तलवार मोडून पाडण्याचा निराळाच डाव योजिला आहे. डाव पण डाव आहे. रामाचा बाण चुकार ठरेल; पण हा डाव भिकार ठरणार नाहीं, एक टोला कीं राम बोला. भोलेनाथ !

**कं०:**—बरोबर-बरोबर-पशुपालाचें म्हणणें अगदीं बरोबर आहे. आम्हीं जर अशी रामबाण योजना करून ठेविली नसती तर अशा आणीबाणीच्या वेळीं आम्ही असे गाफलासारखे नाचरंगांत दंग कसे होऊन गेलों असतों ? तेव्हां ये-अशी शांतचित्तानें आमच्याजवळ बैस; आणि या आनंदविलासाचे दोन घुटके घेऊन आपल्या थकल्या भागल्या जिवाला थोडी विश्रांति दे.

( तिचा हात धरावयास जातो. )

**तेज०:**—थांबा.—तलवारीवांचून मातंगेश्वराला चिरडून टाकण्याची आपली अजब शक्कल काय आहे ती आधीं मला सांगा आणि मग विलासाच्या व विश्रांतीच्या गोष्टी बोला.

**सौदामिनी:**—राजकारणाच्या मसलती कांहीं चव्हाट्यावर सांगावयाच्या नसतात.

**तेजस्विनीः**—चव्हाट्यावर सांगावयाच्या नसतील तर राजमहालांत एकांतांत चला. तेथें आपण बोलत बसूं.

**कंदर्पः**--पण इतकी घाई का? दोन प्रहर रात्र म्हणजे कांहीं युगांची चौकडी नाहीं. उद्यां दिवस निघाल्यावर सर्व प्रधान मंडळी खलबतखान्यांत जमणार आहेत. तेथें तुला सर्व खुलासा अनायासेंच होईल.

**तेजस्विनीः**— छे, मला उद्यां सकाळपर्यंत बिलकूल धीर निघत नाहीं. या वेळींच मला खुलासा पाहिजे. चला—आपण मजबराबर एकीकडे चला, आणि आपल्या योजनेची निदान रूपरेषा तरी मला समजावून द्या. त्यावांचून माझें चित्त कांहीं शांत व्हावयाचें नाहीं.

**कं०ः**--काय बोवा हट्टखोर बायको आहेस तूं! या वेळीं दारूच्या गुंगीनें माझें डोकें जड पडत चाललें आहे आणि तूं माझ्यामागें हा नसता ससेमिरा लाविला आहेस. आतां करावें तरी काय?

**सौदा०ः**—करावयाचें काय? आपल्या जिवाला जर बरें वाटत नसेल तर तसें साफ सांगून टाका. उगीच भीड हवी कशाला? तेजस्विनी, तुझ्याशीं मातंगेश्वरांच्या स्वारीसंबंधानें चर्चा करण्याची यावेळी महाराजांची बिलकूल लहर लागत नाहीं. तेव्हां तुला जर सकाळपर्यंत धीर निघत नसेल तर तूं मुकाट्यानें आपल्या वाटेनें परत जा. उगाच येथें असा धिंगाणा घालून मजलशीचा बदरंग करूं नकोस.—

५ **पद**—यमन—एकताल. " तानोम् दिरदिर० "—

**हाला-मधु-मदविलसित रतिविलास-भर भरला ॥ ध्रु० ॥**
**समर-विषय विषसम हा; ॥ भरवि पिसें । अति**
**सुरसें । सुरतरसें । शृंगार ॥ १ ॥**

**तेज०ः**—महाराजांनी मला तशी आज्ञा करावी. मी या क्षणीं येथून निघून जाण्यास तयार आहे. ( कंदर्पास ) महाराज, काय? चलता ना माझ्याबरोबर? का सौदामिनीचे शब्द ही आपलीच आज्ञा समजून मी हें रतिविलासमंदिर सोडून परत जाऊं?

**कं०ः**—छे-छे. अशी अगदीं डोक्यांत राख घालून घेऊं नकोस. मी तुला थोडक्यांत सर्व कांहीं सांगतों. पण थोडी शांत हो. क्षणभर येथें बैस.

दारूचे दोन घोट घे. म्हणजे तुझें डोकें जरासें ठिकाणावर येईल. आणि मग आपण या सर्व लोकांना येथून घालवून देऊन येथेंच एकांतांत या विषयाची सविस्तर चर्चा करूं. या वेळीं या शृंगारविलासाला कसा बहारीचा रंग चढला आहे. तेव्हां याचा मध्येंच भंग करणें मला आणि तुलाहि उचित नाहीं.

**पशु०:**—बरोबर-सरकारांचें म्हणणें अगदीं बरोबर–अगदीं–रास्त-अगदीं उचित आहे. घटका अर्ध घटकेचा विलंब म्हणजे कांहीं मोठीशीं बाब नाहीं. पेल्यांतील थेंब दोन थेंब जिभेवर शिंपडतां शिंपडतांच एवढा वेळ सहज निघून जाईल. भोलेनाथ !

**कं०:**—तेव्हां समंजस बायकोप्रमाणें ये.–अशी या सुखासनावर येऊन बैस.–हा दारूचा प्याला ओंठाला लाव.—[ तिचा हात धरावयास सरतो ].

**तेज०:**—( दूर सरून ) नाहीं. तुमच्या रामबाण योजनेचा खुलासा झाल्यावांचून मला तुमच्या या रंगविलासांत सामील व्हावयाचें नाहीं.

**सौदा०:**—असाच तुझा हट्ट असेल तर तूं आमच्या मजलशींत सामील झाल्यावांचून तुला आमच्या योजनेंतील एक अक्षरही कळावयाचें नाहीं. ( नृत्यांगनांस ) चला गे, करा नृत्यगायनाला पुनः सुरुवात.

**तेज०:**—(कंदर्पास) महाराज, हा आपलाच निकाल मी समजावयाचा का ?

**कं०:**—(गोंधळून) काय सांगावें बोवा आतां ? मोठी पंचाईत आली. तुला पळाचा दम निघत नाहीं आणि मला दमाला पळ मिळत नाहीं. धरलें तर चावतें आणि सोडलें तर पळतें अशी माझी अवस्था झाली आहे. निकाल आहे म्हणावा तर नाहीं; आणि नाहीं म्हणावा तर आहे. तेव्हां आतां तुलाच काय वाटेल तें तूं समज. वाटल्यास थांब; वाटल्यास जा. मला कांहीं विचारूं नकोस. मी या वेळीं बिलकुल देहभानावर नाहीं.

**तेज०:**—ठीक आहे. चालूं द्या तुमचा नाचरंग. महाराज माझें बोलणें या वेळीं आपणांस रुचावयाचें नाहीं. पण जातां जातां मी आपणांस बजावून ठेवत्यें कीं शत्रु दाराशीं उभा असतां आपण अशा घाणेरड्या विलासरंगांत दंग झाला आहांत हें कांहीं ठीक नाहीं.—

**६ पद**—“ देवता कामुकतारहिता० ”—

**आपदा राज–पदा भयदा ॥ नृपति-काम-भोग-निरति ॥ धृ०॥**

**लोपुनिया चिरसुखदा ॥ दिव्य शील-संपदा ॥**
**पापरता । पामरता ॥ माते; नरपति-**
**शिरिं अरि सदा महाभया धरित ॥ १ ॥**

( निघून जाते ).

**कं०**:—गेली–गेलीच ती अखेरीला निघून. मोठी हट्टखोर बायको आहे !

**सौदा०**:—अजून काय झालें आहे ? ही आतां कोठें नुक्ती सुरवात आहे. खरा मस्तवालपणा अजून पुढेंच आहे. उद्यां लग्न झाल्यावर ती आपल्याला देवडीवरच्या कुत्र्याप्रमाणें वागविणार नाहीं तर काय सांगाल तें ऐकेन.

**पशु०**:—बरोबर–बरोबर–अगदीं बरोबर. महाराजांनीं फक्त घी देखा, लेकिन बडगा नही देखा. भोलेनाथ !

**कं०**:—जाऊ दे. आतां त्याची जास्त चर्चा नको. दारू आणा आणि नाचगाण्याला सुरवात करा. ( मद्यपान व नृत्यगायन सुरूं होतें ).

( पडदा पडतो ).

---

## प्रवेश दुसरा.

( स्थळ:— राजवाड्याचें महाद्वार. सेनापति हालाहल, शिशुपाल, पशुपाल व नागरिकांचे पुढारी. राजदर्शनार्थ राजवाड्यांत प्रवेश करण्याबद्दल झगडा चालू आहे ).

**१ ला पुढारी**:—आम्हांला महाराजांची भेट घेऊंच द्यावयाची नाहीं असा आपला हट्टच असेल तर आमचा इलाजच खुंटला.

**हालाहल**:—भल्या गृहस्थांनो, हा माझा हट्ट नाहीं. महाराजांचा मला तसा सक्त हुकूम आहे. तेव्हां मी काय करणार ? मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. सक्त हुकुमाची सक्तीनें बजावणी करणें हें माझें सक्त काम आहे.

**२ रा पु०**:—महाराजांचाच तसा सक्त हुकुम असेल तर आम्ही तुमच्या कर्तव्याच्या आड येऊं इच्छित नाहीं. पण मेहेरबानी करून एवढा आमचा अर्ज तरी आपण महाराजांच्या जवळ नेऊन गुदरा.

**हाला०**:—छे-दिलगीर आहे-तेंही व्हावयाचें नाहीं. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. नेमल्या कामापलीकडे डोळा वर उचलून पहाणें-सुद्धां मला लष्करी शिस्तीनें मना आहे.

**३ रा पु०**:—म्हणजे हा तर निव्वळ जुलुम झाला म्हणावयाचा ! महाराजांची भेटही तुम्ही आम्हांला घेऊं देत नाहीं आणि आमचा अर्जही त्यांच्या पायाशीं सादर करीत नाहीं. मग मातंगेश्वरांच्या स्वारीसंबंधानें लोकमत काय आहे हें महाराजांना कळावें कसें ?

**शिशु०**:—जरूर काय महाराजांना लोकमत कळण्याची ? महाराज राजे आहेत आणि असल्या प्रश्नांचा स्वतंत्रपणें निर्णय करण्यास लागणारी अक्कल देवानें त्यांना मुबलक दिली आहे.

**पशु०**:—मग तुमच्या अकलेच्या उसन्या शिदोरीची त्यांना जरूर काय ? अस्मानचा रस्ता हुडकण्यासाठीं सूर्याला कांहीं मशालजींच्या मशालींची जरूर लागत नाहीं. भोलेनाथ !

**१ ला पु०**:—अहो देवडीवरचे ठेकेदार, आम्ही आपल्याशीं बोलत नाहीं. सेनापतींशीं बोलत आहोंत.तेव्हां मेहेरबानी करा आणि मधें लुडबुडूं नका.

**शिशु०**:—लुडबुडूं नका ! कां लुडबुडूं नका ? आम्ही महाराजांचे खास खासगी दरबारी आहोंत.

**पशु०**:—आणि आज येथें वाटेल त्या कामांत लुडबुडण्याचा आम्हांला महाराजांकडून खास जादा अधिकार देण्यात आलेला आहे. काय समजलां आहांत ! भोलेनाथ !

**हाला०**:—बरोबर आहे त्यांचें म्हणणें. आजच्या अवघड प्रसंगीं माझ्याकडून लष्करी कायद्याचा अद्वातद्वा उपयोग होऊं नये म्हणून या दोन राजमान्य खास खासगी दरबारियांची माझ्यावर मुद्दाम खास देखरेख ठेवण्यांत आलेली आहे. तेव्हां वाटेल त्या डबक्यांत तोंड खुपसण्याचा त्यांना आज कुल अखत्यार आहे. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. मी त्यांना बिलकुल रोखूं शकत नाहीं शिवाय मला स्वतःलाहि तुमचा हा अव्यापारेषु व्यापार बिलकुल पसंत नाहीं.

**२ रा पु०**:—आपल्या पसंतीनापसंतीचा हा सवालच नाहीं. आपण

फक्त हुकुमाचे ताबेदार आहांत. आणि आपणाला ताबेदार या नात्यानें आमचा हा अर्ज महाराजांना नेऊन पोहोंचविलाच पाहिजे.

**शिशु०:**—पोहोंचविलाच पाहिजे? म्हणजे हे तुमचे ताबेदार आहेत असें समजतां वाटतें तुम्ही?

**२ रा पु०:**—अलबत्. राजाचे नोकर रयतेचे ताबेदारच आहेत.

**हाला०:**—( मधेंच ) खामोष. असले राजद्रोही शब्द माझ्यासमोर उच्चाराल तर मी एकदम लष्करी कायदा पुकारीन, याद राखून ठेवा. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. मला राजद्रोह हा शब्दसुद्धां बरदास्त होत नाहीं.

**१ ला पु०:**—सेनापति, लष्करी कायद्याची धमकी तुम्ही कोणाला देत आहांत याची कांहीं शुद्ध आहे का तुम्हांला?

**हाला०:**—भलत्या गोष्टींची शुद्ध ठेवण्याचें मला कारण काय? मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. आणि मिळालेल्या हुकुमाची चोख तामिली बजावण्याची मला शुद्ध राहिली म्हणजे बस् आहे.

**पशु०:**—बरोबर-बरोबर-अगदीं बरोबर. विधवेला कुंकवाची उठाठेव हवी कशाला? भोलेनाथ!

**२ रा पु०:**—आम्ही लोकांचे पुढारी आहोंत—प्रतिनिधि आहोंत.

**शिशु०:**—असाल—

**पशु०:**—अगर नसाल.—

**हाला०:**—अगर असाल आणि नसाल. मला काय गरज आहे तुमच्याशीं? मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. मी एक फक्त आपल्या राजाला जाणतो. लोकबिक कांहीं जाणत नाहीं; आणि लोकांच्या पुढाऱ्यांना तर मी कस्पटाप्रमाणेंच लेखतों.

**शिशु०:**—अगदीं रास्त—अगदीं योग्य.—

**पशु०:**—बिलकुल शिस्त; घाण्याचा बैल फक्त तेल्याचा लागणदार;—तांबोळ्याचा आणि त्याचा कांहीं एक संबंध नाहीं. भोलेनाथ!

**३ रा पु०:**—तुमचीं हीं उर्मटपणाचीं भाषणें आम्हांला लोकांच्या कानांवर घालावीं लागतील.

**हाला०**:—खुशाल घाला. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. लोकाच्या कानांचा मला बिलकुल डर नाहीं.

**१ ला पु०**:—लोकांचे कान म्हणजे काय समजतां तुम्ही ?

**हाला०**:—लोकांचे कान म्हणजे लोकांचे कानच समजतों मी. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. कान म्हणजे हात नव्हेत अगर कान म्हणजे पाय नव्हेत एवढें समजण्याइतकी अक्कल माझ्या डोक्यात खास आहे.

**पशु०**:—अलबत्. असलीच पाहिजे. सेनापतीचें डोकें म्हणजे कांहीं एकाद्या देवळाचा पोकळ घुमट नाहीं. हें दगडांचें भरगच्च भरलेलें पेव आहे. काय समजलांत ? भोलेनाथ !

**शिशु०**:—बरोबर-बरोबर. कानाला नाक अगर नाकाला तोंड जर हे समजत असते तर यांना सैन्याचे अधिपति कोणीं केलें असतें ?

**पशु०**:—अलबत्. कोणीं केले असतें ? सैन्याचा अधिपति म्हणजे कांहीं बिगारीचा बैल नाहीं. तो एक भला जंगी मानव अधिकारी आहे. आणि त्याला कान म्हणजे कान—नाक म्हणजे नाक—तोंड म्हणजे तोंड हें अगाध ज्ञान असलेंच पाहिजे. भोलेनाथ !

**२ रा पु०**:—तर मग आम्हीं आतां येथून परत जावें ?

**शिशु०**:—बेलाशक जावें.—

**पशु०**:—बेलाशक जावें.—

**हाला०**:—बेधडक जावें. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. तुम्ही आपण होऊन जाऊं लागलांत तर मी तुमचा रस्ता रोखणार नाहीं. अगर तुमचा पाठलागहि करणार नाहीं.

**३ रा पु०**:—आणि परत न गेलों तर ?

**शिशु०**:—खुशाल येथें हवा खात हिंडावें.—

**पशु०**:—अगर माशा मारीत उभें रहावें.—

**हाला०**:—अगर माझ्या शिपायांच्या पहाऱ्यांत आराम घेत बसावें. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. निष्कारण तुम्ही येथें माझ्याशीं हुज्जत घालीत बसलांत तर मी तुम्हांला आपल्या लोकांकडून बिनादिक्कत कैद करवीन. बिलकुल मुलाजा करणार नाहीं.

१ ला पु०:—आम्हांला कैद केलेंत तर लोक खवळून जातील.—

हाला०:—जाऊं द्या. त्याची फिकीर नको आपल्याला. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. दंगेखोरांचा बंदोबस्त करण्याची कला मला पूर्ण अवगत आहे.

शिशु०:—आणि तिचा उपयोग करण्यासाठीं यांच्यापाशीं शिकारी कुत्र्यांचा जंगी तांडाही आहे.—

पशु०:—आणि त्या शिकारी कुत्र्यांच्या कमरांना अस्मानच्या बिजली-प्रमाणे चमकणाऱ्या तल्लख तलवारीही भरभक्कम लटकल्या आहेत. तेव्हां या सैतानांच्या सरदाराला, शहाणे असाल तर, नाहक चिडवूं नका—आणि घरच्या बायकापोरांना हकनाक रडवू नका. भोलेनाथ!

२ रा पु०:—असेंच असेल तर आम्ही येथून हालतच नाहीं. तुम-च्याशीं हुज्जतच घालीत बसतों. हिंमत असेल तर करा आम्हांला कैद.

हाला०:—हिंमत! तुम्हांला कैद करावयास हिंमत कशाला पाहिजे? मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. नुसत्या शब्दाबरोबर मी तुम्हांला कैदच काय पण सपशेल लंबेसुद्धां करूं शकतों.

शिशु०:—बेशक करूं शकतों.—

पशु०:—बेलाशक करूं शकतों. गाई कांपतां आल्या नाहींत तर तो कसाब कसला आणि माणसें मारतां आलीं नाहींत तर तो सेनापति कसला? भोलेनाथ!

हाला०:—तेव्हां बोला. मुकाट्यानें आल्या वाटेनें परत जातां का माझ्या लष्करी हिमतीची परीक्षा पाहातां? मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. परीक्षेला मी नटणार नाहीं आणि परीक्षेंत मी हटणार नाहीं.

शिशु०:—तेव्हां बोला—नीट विचार करून सांगा.

पशु०:—नाहींतर पुढें पस्तावाल. पहा—इंगा फिरला कीं पिंगा सरला. भोलेनाथ!

३ रा पु०:—ठीक आहे. आम्ही तुमचा इंगाच पहाणार. चला, होऊन जाऊं द्या दोन दोन हात.

हाला०:—अस्सें काय ? बहोत बेश. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. मला तुमचें युद्धाचें आव्हान स्वीकारलेंच पाहिजे.

शिशु०:—अलबत्. स्वीकारलेंच पाहिजे.

पशु०:—तोंडाला तोंड आणि हाताला हात दिला नाहीं तर लष्करी शिस्त ती काय ? भोलेनाथ !

हाला०:—शिशुपाल–पशुपाल–तुम्ही महाराजांचे खास खासगी दरबारी आहांत आणि या वेळीं माझे वरिष्ठ अधिकारी आहात.

शिशु०:—कबूल.—

पशु०:—बिनतक्रार कबूल–भोलेनाथ !

हाला०:—तुम्हीं सारा प्रकार स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिला आहे आणि अखेरपर्यंत मी किती शांत राहिलो हें तुम्हांला पूर्ण माहीत आहे.

शिशु०:—कबूल-कबूल—

पशु०:—बिनबोभाट कबूल–भोलेनाथ !

हाला०:—तेव्हा आतां यांच्यावर हात उचलण्याला मला तुमची परवानगी पाहिजे–तुमचा हुकूम पाहिजे.

शिशु०:—माझी सदर परवानगी आहे.

पशु०:—आणि माझाही सरोस हुकूम आहे, भोलेनाथ !

हाला०: —मी आपला आभारी आहें. [ शिपायांस ] शिपायांनो, या दंगेखोरांना फौरन गिरफ्दार करा. [ शिपायी तसें करूं लागणार तोंच तेजस्विनी एकदम प्रवेश करते ].

तेज०:—गिरफ्दार करा ! कोणाला गिरफ्दार करा ?

पशु०:—[ घाबरून शिशुपालास एकीकडे ] अरे बापरे ! ही आकाळवीज एकदम येथें कशी उमटली ? भोलेनाथ !

हाला०:—[ तेजस्विनीस ] या लोकांना गिरफ्दार करण्याचा मीं हुकूम केला आहे.

तेज०:— चला— फिरा मागें. या लोकांच्या केंसाला धक्का लागला तर येथें रक्ताचा सडा पडेल.

हाला०:—सडा पडो नाहीं तर पाऊस पडो. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. मी केला हुकूम परत घेणार नाहीं. ताईसाहेबांनीं उगाच मधें पडूं नये.

तेज०:—कां पडूं नये? वाटेल त्यावर वाटेल त्या वेळीं तुम्ही जर निष्कारण हमला करूं लागलांत तर तुमचा प्रतिकार केलाच पाहिजे.

शिशु०:—[पशुपालास हळूंच] पशुपाल, आतां प्रकरण हातघाईवर येणार.

पशु०:—[शिशुपालास हळूंच] प्रकरण हातघाईवर आलें तर आपला गनिमी कावा आहेच बहाल. यः पलायते स जीवति. भोलेनाथ!

हाला:०—ताईसाहेब मी यांच्यावर निष्कारण हमला करीत नाहीं. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. कारणावाचून तलवार उपसण्याचा माझा बिलकुल शिरस्ता नाहीं.

शिशु०:—बरोबर आहे. सेनापतीचें म्हणणें अक्षरशः खरें आहे. कारणावांचून क्रिया करणें हें त्याना जन्मात ठाऊक नाहीं.

पशु०:—आणि क्रियेवांचून कारण करणें हेंही त्यांना जन्मांत ठाऊक नाहीं. मागें नाहीं तर पुढें. पण कोठें तरी त्यांच्या क्रियेला कारणाचें शेंपूट नेहमीं चिकटलेलें हें असतेंच असतें, भोलेनाथ!

तेज०:—गिरफ्दारीचा हुकूम सोडण्याला यांनीं तुमचा कोणता गुन्हा केला?

शिशु०:—महाराजाची भेट घेण्याचा यांनीं हट्ट धरला.

पशु०:—आणि आपला हट्ट न सोडण्याचाही यांनीं हट्ट धरला! चोर ते चोर आणि वर शिरजोर, भोलेनाथ!

१ ला पु०:—तुम्ही जर आम्हांला मुकाट्यानें राजवाड्यांत जाऊं दिलें असतें तर हट्ट धरण्याचें आम्हांला काय कारण होतें?

हाला०:—राजवाड्यांत कोणालाही सोडूं नये असा मला सक्त हुकूम असतां मी तुम्हांला मुकाट्यानें कसा आंत जाऊं देणार? मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. सरकारी हुकूम पायांखालीं तुडविण्याचा फाजील उद्धटपणा तुमच्याप्रमाणें माझ्या अंगीं अद्यापि आलेला नाहीं.

पशु०:—बरोबर आहे. मोकाट जनावरांपेक्षां दावणींतील जनावरें नेहमींच अधिक संभावित असतात, समजलांत. भोलेनाथ !

तेज०:—लोकांच्या सन्मान्य पुढाऱ्यांनाही मज्जाव करण्याचा तुम्हांला सक्त हुकूम आहे काय ?

शिशु०:—पुढाऱ्यांनाच काय, पण खुद्द आपल्याला सुद्धां मज्जाव करण्याचा सेनापतींना सक्त हुकूम आहे !

तेज०:—काय ? मला सुद्धां राजवाड्यांत जाण्याची बंदी करण्यांत आलेली आहे ?

पशु०:—आपल्याला सुद्धां काय ? आपल्यालाच बंदी करण्यासाठीं हा सारा खटाटोप आहे. हे बिचारे नुस्ते चोरापायीं संन्याशी सुळी जात आहेत. खरा रोख कांहीं यांच्यावर नाहीं. खरा रोख आपल्यावर आहे. भोलेनाथ !

तेज०:—(विचार करून) असेंच असेल तर मला आंत गेलेंच पाहिजे.

हाला०:—मी आपणाला आंत जाऊं देणार नाहीं. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. हुकुमापुढें मला माणसाची पर्वा नाहीं.

शिशु०.—( पशुपालास हळूंच ) पशुपाल, आली घसरंपट्टीची वेळ.

पशु०:—( शिशुपालास हळूंच ) मग उचल पाय. कुत्ता जाने-चमडा जाने. भोलेनाथ !

तेज०:—हालाहल, मुकाट्यानें मला आंत जाऊं द्या. नाहीं तर जबरदस्तीनें मला आपला रस्ता साफ करून घ्यावा लागेल.

हाला०:—आपण जबरदस्तीनें आंत शिरण्याचा यत्न कराल तर मलाही आपल्याला जबरदस्तीनें बाहेर काढावें लागेल. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. धक्क्यास बुक्का आणि बोटास सोटा असें माझें शास्त्रच आहे.

तेज०:—तर मग हालाहल, तुमचा हुकूम मोडून मी आंत शिरणार; आणि मी एकटीच शिरणार असें नाहीं तर या लोकांच्या पुढाऱ्यांनाही आपल्याबरोबर आंत घेऊन जाणार.

हाला०:—( शिशु० व पशु० यांस ) शिशुपाल, पशुपाल, कांहीं कारण नसतां ताईसाहेबांनीं प्रकरण हातघाईवर आणलें आहे. मी लष्करी शिस्तीचा

माणूस आहे. मला आतां ही दांडगाई बरदास्त करतां येत नाहीं. तेव्हां लष्करी शिस्तीप्रमाणें मी तुमच्या परवानगीनें आणि हुकुमानें ताईसाहेबांना अडवितों.

**शिशुपाल**:—अडवा–अडवा–बेशक अडवा. माझी सदर परवानगी आहे.

**पशुपालः**—अडवा–अडवा–बेलाशक अडवा. माझा सरीस हुकूम आहे. ( शिशुपालास एकीकडे ) साप मरो नाहीं तर संन्यासी मरो; घरमालकाचा जीव सलामत राहिला म्हणजे बस्. भोलेनाथ !

**हालाहलः**—( तेजस्विनीस आडवा होऊन ) ताईसाहेब, थांबा. पुढें पाऊल टाकूं नका. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. मला दूर सारून आंत शिरण्याचा यत्न कराल तर नाहक प्राणास मुकाल.

**शिशुपालः**—शाबास—

**पशुपालः**—भलेबहाद्दर—

**शिशुपालः**—चालूं द्या. आम्ही महाराजांना वर्दी देतों—

**पशुपालः**—आणि तुम्हांला कुमक पाठवितों. भोलेनाथ !

( दोघे जाऊं लागतात ).

**हालाहलः**—थांबा, तुम्ही येथून जाऊं नका–

**शिशुपालः**—( पशुपालास एकीकडे ) आली कंबख्ति !

**पशुपालः**—मग घे देवाचें नांव. श्रीराम जयराम जय जय राम ! भोलेनाथ !

**तेजस्विनीः**—गृहस्थहो, आपल्या तलवारी काढा आणि माझ्या मागून या.

**हालाहलः**—शिपायांनो, तुम्हीही तलवारी काढा आणि यांना आडवे व्हा. ( दोन्ही पक्षांत दंगल सुरू होते. तेजस्विनी व पुढारी दांडगाईनें आंत शिरतात ). अरे–अरे–अरे-शिरले आंत ! दौडा–पळा–पकडा त्यांना. ( शिपायी त्यांचा पाठलाग करतात ). शिशुपाल, पशुपाल, चला-तुम्हीही उचला पाय आणि लागा त्यांच्या पाठीस.

**शिशुपालः**—सेनापतिसाहेब, आम्ही दरबारी शिस्तीचे संभावित लोक आहोंत.

**पशुपालः**—लष्करी शिस्तीचे हडेलहप्पी लोक नाहीं. भोलेनाथ!

**शिशुपालः**—आम्हांला पोरांसोरांसारखी धावपळ शोभत नाहीं.

**पशुपालः**—आणि त्यांतही दुसऱ्यांच्या माग पळणें तर बिलकुलच शोभत नाहीं. दरबारी म्हणजे पुढारी.-त्यांचें पळण्यांतसुद्धां पाऊल पुढें पाहिजे. भोलेनाथ!

**शिशुपालः**--तेव्हां तुम्ही इकडून त्यांचा पाठलाग करून त्यांना पकडा.

**पशुपालः**—आणि आम्ही इकडून पुढें जाऊन महाराजांना या दंग्याची वर्दी देतों. म्हणजे बरोबर कामाची वांटणी झाली. दळावयाला तुम्ही आणि पळावयाला आम्ही. भोलेनाथ! ( पळून जातात ).

**हालाहलः**—अरे-अरे गेले-गेले लेकाचे पळून! खरोखर, दरबारी तट्टें म्हणजे अशींच अवसानघातकी असावयाचीं. फक्त मुजोरींत पटाईत. हाताशीं प्रसंग आला कीं यांनीं पायांचा पराक्रम दाखविलाच. पण जाऊं द्या. यांच्या नादीं लागण्यांत कांहीं आपला निभाव नाहीं. आपण लष्करी शिस्तीचे लोक. आपल्याला दुस्मानांचा पिच्छा पुरविलाच पाहिजे. ( जातो ).

—पडदा पडतो.—

---

## प्रवेश तिसरा.

( **स्थळः**—राजवाडा. कंदर्प व सौदामिनी ).

**सौदामिनीः**—आज सकाळीं उठल्यापासून आपण हें आरंभिलें आहे काय? काल संध्याकाळीं आपण तहाचा निश्चय केलात आणि चार प्रहरांची रात्र उलटून गेली नाहीं तोंच सकाळीं लढाईच्या गोष्टी बोलूं लागलात म्हणजे आहे तरी काय हें? राजकारण म्हणजे पोरखेळ आहे असें का आपल्याला वाटतें?

**कंदर्पः**—पोरखेळ आहे असें वाटत नाहीं. पण काल रात्रीं तेजस्विनीचे विलासमंदिरांतील शब्द कानीं पडल्यापासून माझी बुद्धि अगदीं बावचळल्यासारखी झाली आहे. आणि मातंगेश्वराशीं तह करण्यांत आपण मोठी चूक करीत आहोंत अशी मनाला सारखी टोंचणी लागून राहिली आहे.

**सौदामिनीः**—पण तेजस्विनीच्या शब्दांची इतकी टोचणी लागावयाला तेजस्विनी अशी आहे कोण? तिला राजकारण कळतें, का युद्धशास्त्र कळतें का कळतें तरी काय? ती म्हणजे एक तापट स्वभावाची अडमुठी अडदांड पोर! कोणी 'अरे' म्हटलें कीं ताडकन् त्याला 'कारे' म्हणावयाचें एवढें तिला ठाऊक. राजकारणांतील साऱ्या वेड्यावांकड्या गुंतागुंती सोडवून प्रसंगास योग्य असें धोरण ठरविण्याची तिच्यांत कांहीं लायकी आहे का? मातंगेश्वराचा खलिता वाचून मलासुद्धां रागाची उसळी आली होती आणि एकदम जाऊन त्या मेल्या उद्धटाच्या नरडीचा घोंट घ्यावा असें मनाला वाटलें होतें. पण बलवान् शत्रूच्या नरडीचा घोंट घेण्याला आपले दांत शाबूत पाहिजेत ना? त्यांचीं तर पाळेंमुळेंसुद्धां खिळखिळीं झालेलीं. मग करावयाचें काय? नाहींतर कट्टया दुस्मानाच्या पायांवर लोटांगण घालणें हें मला तरी कबूल झालें असतें असें आपल्याला वाटतें का?—मला हें समजत का नाहीं कीं—

७ **पद.** जीवनपुरी–त्रिताल. "पैय्या सैय्या०–"

**धीरा वीरा स्वकुल यश–नाश।**
**मृत्युहुनी विपदा घोरा॥ ध्रु०॥**
**स्वरिपुचरण–शरणागति हरवी॥**
**थोर वीर–कुल–लौकिक सारा॥ १॥**

**कंदर्पः**—(सचिंत) काय करावें? कांहीं सुचत नाहीं! जन्मभर कदंबांच्या लाथा खातां खातां ज्याच्या कपाळाला घट्टे पडले त्या एका क्षुद्र संस्थानिकापुढें मस्तक नम्र करण्याची पाळी यावी म्हणजे दैवदुर्विलासाची कमाल झाली! खरोखर—

८ **पद.** बेहाग–त्रिताल. "टेरसुनी पीयाके०–"

**दासपणें जगतांत मिरविणें॥**
**त्याहुनि शतपट बरवें मरणें॥ ध्रु०॥**
**पारतंत्र्य भूवरिचा रौरव॥**
**अधःपात पथ हा अनुसरणें॥ १॥**

( सचिंत उभा रहातो. प्रधान कालकूट व मंत्रि तहनाम्याचा कागद घेऊन येतात ).

**कालकूटः**—सरकार, हा तहनाम्याचा कागद तयार आहे. यावर आतां सरकारांनीं सही करावी. मुदतीची वेळ अगदीं भरत आली आहे.

**सौदामिनीः**—तो कागद फाडून टाका. सरकारांची तहाची लहर लागत नाहीं. त्यांना आतां लढाईची सुरसुरी आली आहे.

**कालकूटः**—काय ? सरकार लढाई पुकारूं इच्छितात ? म्हणजे ? काल रात्रीं तहाचा विचार नक्की झाला होता आणि आज एकदम लढाई कशी उमटली ?

**सौदामिनीः**—तेजस्विनीबाईंचा फेरा काल रात्रीं आला ना ? झालें. त्यांचा पांढरा पाय घराला लागतांच त्यांना आत्महत्येचे डोहाळे होऊं लागले.

**कालकूटः**—सरकार, आपण ही आमची थट्टा का मांडली आहे ? प्रसंग कोण–परिस्थिति कोण याचा कांहींच विचार सरकारांना दिसत नाहीं याचा अर्थ काय ? दुस्मान् दाराशीं येऊन उभा आहे–दार ठोठावतो आहे आणि आपले हे असे चाळे चालले आहेत. म्हणजे याला म्हणावें काय ?

**कंदर्पः**—प्रधानजी, मी अगदीं भांबावून गेलों आहें !

**कालकूटः**—आपण भांबावून गेला आहांत तर जे भांबावून गेले नाहींत त्यांच्या सांगण्याप्रमाणें वागा. मी सावध आहें–सौदामिनी राणीसाहेब सावध आहेत–सारें मंत्रिमंडळ सावध आहे. आम्हांला सर्व परिस्थिति आरशाप्रमाणें स्वच्छ दिसत असून तीवर रामबाण उपाययोजना कोणती करावी हें आम्हांला बिनचूक कळत आहे. शिवाय आम्ही कांहीं आपले दुस्मान नाहीं. दोस्त–इतकेंच नव्हे तर इमानदार दोस्त–आहोंत. मग आमच्यावर विश्वास टाकण्यास आपल्याला शंका कां वाटते ?

**कंदर्पः**—तुमच्याबद्दल शंका वाटत नाहीं. पण काल रात्रीं तेजस्विनीचे शब्द ऐकल्यापासून तह करण्यांत कांहीं चूक होत आहे कीं काय अशा संशयानें माझें मन पछाडलें गेलें आहे.

**कालकूटः**—बरोबर आहे. प्रेमाच्या माणसाच्या शब्दांचा असा परिणाम व्हावयाचाच. परंतु तेजस्विनीचे शब्द प्रेमाचे असले तरी शहाणपणाचे नाहींत.

तह करण्यांत चूक झाली असती. पण केव्हां? तहामुळें राज्यास आणि वैभवास कायमचे मुकण्याची पाळी आली असती तेव्हां. पण तसें झालें असतें तर आम्हींच मुळीं महाराजांना तह करण्याचा आग्रह केला नसता; लढाईचीच सल्ला दिली असती. पण आज तसा प्रसंग नाहीं. मातंगेश्वराशीं विनयानें व गोडी गुलाबीनें वागल्यास आपलें राज्य आपणास बिनहरकत परत मिळण्याचा जबरदस्त संभव आहे किंबहुना मातंगेश्वरानें तसें जवळ जवळ आपणांस आश्वासनच दिलेलें आहे. मग एका साध्या नमस्कारानेंच बिनबोभाट काम पार पडत असतां निष्कारण हातघाईवर प्रसंग आणण्यांत मतलब काय?

**कंदर्पः**—ठीक आहे.दैवावर हवाला टाकून मी तहनाम्यावर तुमच्यासाठीं सही करतों. आणा-तो कागद इकडे आणा. मला तो एकवार वाचून पाहूं द्या.

**कालकूटः**—हा घ्यावा. (कागद त्याच्या हातीं देतों व तो वाचूं लागतो. इतक्यांत पडद्यांत "धरा-आडवा-आत जाऊं देऊं नका" असा गलबला होतो).

**कंदर्पः**—( दचकून ) कसला गलबला आहे बाहेर?

**सौदा०ः**—देवल, पहा काय गडबड आहे ती आणि सेनापतींना सांगून एकदम बंद कर. ( शिशुपाल व पशुपाल धावत येतात ).

**शिशु०ः**—राणीसरकार–राणीसरकार–तेजस्विनी बाईसाहेब–

**कंदर्पः**—काय? तेजस्विनी आली? ( गलबला होतो ).

**शिशु०ः**—होय सरकार, सेनापतींचा मनाईचा हुकूम मोडून–

**सौदा०ः**—चूप. फाजील गडबड नको आम्हांला.

**पशु०ः**—भोलेनाथ!

**सौदामिनीः**—ताबडतोब परत जा आणि त्यांना इकडे घेऊन या.

**कंदर्पः**—जा-जा-निघा. मी अगदीं तिची वाट पाहत आहे.

**शिशु०ः**—हें आम्हांला काय माहीत? नाहींतर—

**सौदा०ः**—अरे, पुनः तुमचा वात्रटपणा सुरू झाला.

**पशु०ः**—भोलेनाथ!

**सौदा०ः**—चला-निघा-जा-आणि त्यांना एकदम इकडे घेऊन या.

( ते जातात. पुनः गलबला ).

**कंदर्पः**—अरे--पुनः गलबला! धरा--आडवा--आंत जाऊं देऊं नका कोणाला? असें आलें आहे तरी कोण बाहेर? आणि त्याला अडविण्याचें

कारण काय ? कांहीं दगा फटका तर नाहीं ? ( तेजस्विनी व पुढारी प्रवेश करतात व त्यांच्यामागून हालाहलादि येतात ).

**तेज०:**—दगा फटकाच आहे. महाराजांनी एक क्षणभरसुद्धां येथें थांबू नये. तावडतोब माझ्याबरोबर बाहेर पडावें. नाहींतर महाराजांचे हितशत्रु महाराजांच्या मानेवर आपल्या कपटाच्या तलवारीचा घाव घातल्यावांचून खास रहाणार नाहींत.

**कं०:**—शत्रु ? कोठें आहेत शत्रु ?

**तेज०:**–हे येथें-आपल्या सभोंवार-आपल्याला गराडा देऊन उभे आहेत.

**कं०:**—काय ? माझ्या सभोंवार मला गराडा देऊन उभे आहेत ! मग मला दिसत नाहींत कसे ?

**तेज०:**–आपल्याला दिसत आहेत. पण आपण त्यांना ओळखूं शकत नाहीं.

**काल०:**—म्हणजे ? ताईसाहेबांचा आमच्यावर रोंख आहे कीं काय ?

**तेज०:**—होय. तुमच्यावरच माझा रोंख आहे. तुम्हीच महाराजांचे हितशत्रु आहात आणि एकांतांत महाराजांचा नाश करणाचा तुमचाच प्रयत्न चालला आहे.

**काल०:**—सरकार, आपल्यासमक्ष हा मंत्रिमंडळाचा धडधडीत अपमान होत आहे.

**तेज०:**—चोरांना चोर म्हणण्यांत त्यांचा अपमान कसला आला आहे ?

**काल०:**—चोरांना चोर म्हणण्यांत चोरांचा अपमान होत नसला तरी चोरीचे माप पदरांत टाकल्यावांचून चोरांनाही चोर म्हणतां येत नाहीं हें ताईसाहेबांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे.

**तेज०:**—पण तुमच्या पापाचें माप तुमच्या पदरांत टाकावयाला चित्रगुप्ताच्या चोपड्यांचा पुरावा नको आहे. मातंगेश्वराच्या खलित्याला देण्यासाठीं तुम्हीं तयार केलेला हा जबाब तुमचीं सारीं पापें चव्हाट्यावर मांडण्याला पूर्ण समर्थ आहे.

**सौदा०:**—आपल्या विवेकबुद्धीला पटेल तो अभिप्राय स्पष्ट जाहीर करणें म्हणजे शत्रुत्व करणें आहे वाटतें ?

**तेज०:**—बाईसाहेब, शरणागतीची दुष्ट कल्पना ज्या बुद्धीला सुचते व रुचते ती मुळीं खरी विवेकबुद्धिच नव्हे. विवेकबुद्धि ही मूर्तिमंत निर्भयता आहे. तिला भ्याडपणाच्या पातकी कल्पनांचा वाराहि सहन होत नाहीं.

**काल०:**—म्हणजे ! मंत्रिमंडळावर आपण भ्याडपणाचा आरोप करितां कीं काय ?

**तेज०:**—बेशक करत्यें. मंत्रिमंडळाच्या अंगांत थोडीही हिंमत असती तर त्यानें शरणागतीच्या अधमाधम विचाराला आपल्या डोक्यात क्षणमात्रही थारा दिला नसता.

**काल०:**—शरणागतीचा विचार भ्याडपणाचा तसाच शहापणाचाही असूं शकेल.

**तेज०:**—शक्य नाहीं. कालकूट शरणागति ही कदंबाचा अधःपात आहे.

**काल०:**—अधःपात असला तरी आजच्या प्रणासंकटांतून सहीसलामत बाहेर पडण्याला शरणागतीवांचून अन्य उपायच नाहीं.

**तेज०:**—कोण म्हणतो अन्य उपाय नाहीं ? कदंबाची तलवार शाबूत आहे आणि या प्राणसंकटांत कदंबाचें संरक्षण करण्यास ती सर्वथैव समर्थ आहे.

**काल०:**—परंतु तलवारीचा अवलंब करणें म्हणजे साक्षात् मृत्यूलाच निमंत्रण करणें आहे.

**तेज०:**—आणि शरणागतीचा अवलंब करणें म्हणजे अमरपद प्राप्त करून घेणें आहे वाटतें ?

**सौदा०:**—शरणागतीनें अमरपदाची प्राप्ति झाली नाहीं तरी मरण खास टळेल.

**तेज०:**—पण मरण टळून गुलामगिरी पत्करण्यांत अर्थ काय ? गुलामगिरी आणि मरण हीं सख्खीं भावंडें आहेत. किंबहुना गुलामगिरी ही मरणाहून मरण आहे.

९ **पद**—" अब छेडोना पराई कान्हा० "—

**परवशता पाश दैवें ज्याच्या गळां लागला ॥**
**सजिवपणीं घडती सारे । मरण-भोग त्याला ॥ ध्रु० ॥**

**असुनि खास मालक घरचा। म्हणति चोर त्याला ॥ १ ॥**
**सौख्य-भोग इतरां सारे। कष्ट मात्र त्याला ॥ २ ॥**
**मातृभूमि त्याची त्याला। होत बंदिशाला ॥ ३ ॥**

**सौदा०:**—परवशता ही मरणाहूनही भयंकर असली तरी तींत जगलों वाचलों तर गेलेलें स्वातंत्र्य पुनः परत मिळवूं अशी आशा करावयास तरी जागा असते. परंतु मरणानें स्वातंत्र्याला तर मुकावें लागतेंच पण त्याबरोबर स्वातंत्र्याची आशाही समूळ नष्ट होते.

**तेज०:**—मरणाच्या भितीनें स्वातंत्र्यांत आपल्या स्वातंत्रतेचें रक्षण करण्याची ज्यांना हिंमत होत नाहीं ते पारतंत्र्यांत गतस्वातंत्र्य सपादन करण्याचें साहस करतील ही आशा कशाला पाहिजे? महाराज, कदंबानें दुबळेपणानें आज पारतंत्र्य स्वीकारिलें तर कादंबांच्या ठिकाणीं आज जागृत असलेलें स्वातंत्र्यप्रेम व वसत असलेली क्षात्रवृत्ति उद्यां शत्रु हरप्रयत्नानें मारून टाकील आणि गुलामगिरींतच आनंद मानण्याइतकें नेभळेपण लोकांत उत्पन्न करून गतस्वातंत्र्य संपादन करण्याची कल्पनाही लोकांस सुचूं देणार नाहीं. तेव्हां हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागण्यांत अर्थ काय? हा प्रत्यक्ष आत्मघात आहे.—ही साक्षात् आत्महत्या आहे!

**काल०:**—महाराज, तेजस्विनीताईसाहेब सांगत आहेत त्या सर्व गोष्टींचा मंत्रिमंडळानें पूर्ण विचार करूनच सरकारास तहाचा सल्ला दिलेला आहे. काल काय झालें, आज काय होत आहे व उद्यां काय होईल या गोष्टी तेजस्विनी ताईसाहेबांपेक्षां मंत्रिमंडळास अधिक चांगल्या समजतात.

**सौदा०:**—तेव्हां आतां निष्कारण वादविवादांत कालाचा अपव्यय करण्यापेक्षां तहनाम्यावर सही करून राज्यदानाचें उदक मातंगेश्वरांच्या हातावर सोडण्याचाच निश्चय महाराजांनीं कायम करावा हें उत्तम!

**तेज०:**—पण लोकांच्या संमतीवांचून लोकांच्या इच्छेविरुद्ध राज्यदानाचें उदक मातंगेश्वराच्या हातावर महाराजांना कधींही सोडतां येणार नाहीं.

**सौदा०:**—कां सोडतां येणार नाहीं? राज्य हें राजाचें आहे आणि त्याची वाटेल तशी विल्हेवाट लावण्याचा त्याला पूर्ण अखत्यार आहे.

तेज०:—बिलकुल नाहीं. जमिनीचा अफाट विस्तार अगर संपत्तीचा अलोट सांठा म्हणजे कांही राज्य नाहीं. राज्य म्हणजे राजाच्या ताब्यांत लोकांनीं आपल्या स्वातंत्र्याची ठेवलेली ठेव आहे; व तिच्यावर लोकांची मालकी आहे; राजाची मालकी नाहीं. राजा फक्त तिच्या संरक्षणार्थ व संवर्धनार्थ नेमलेला लोकांचा सर्वश्रेष्ठ सेवक आहे. त्याला फक्त तिच्या रक्षणाचा व वर्धनाचाच अधिकार आहे; आपल्या लहरीप्रमाणें तिची वाटेल तशी उधळपट्टी करण्याचा अगर ती त्या चोराच्या स्वाधीन करण्याचा अधिकार नाहीं.

कं०:—पण मातंगेश्वरासारख्या जबरदस्त शत्रूपासून राज्याचें रक्षण करण्यास आम्ही असमर्थ असलों तर?

तेज०:—राज्याचे रक्षण करण्यास आपण असमर्थ आहोंत तशी आपल्या दिलाची बालंबाल खात्री होऊन चुकली असेल तर आपण आपल्या राजसिंहासनावरून आतांच्या आतां ताबडतोब खालीं उतरा आणि तें लोकांच्या स्वाधीन करा. लोकांच्या स्वातंत्र्याचें परचक्रापासून संरक्षण करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषाला राजसिंहासनावर आरूढ होण्याचा मुळींच हक्कच नाहीं.

कं०:—वाहवा! खूप तत्त्वज्ञान शोधून काढलेंस. म्हणे आम्हांला राजसिंहासनावर बसण्याचा मुळीं हक्कच नाहीं! कां हक्क नाहीं? मी कांहीं कोणी बाजारांत खरेदी करून आणलेला बिनवारशी उपटसुंभ नाहीं. मी राजकुलांत खास राजाच्या पोटीं जन्मास आलेला राजपुत्र आहें आणि राजसिंहासन हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे. तो माझ्यापासून कोण हिरावून घेणार? मी दुबळा असलों—असमर्थ असलों—अशक्त असलों तरी तेवढ्यामुळें माझ्या जन्मसिद्ध हक्काला केव्हांही बाध येऊं शकत नाहीं. मी राजा आहें—माझ्या राज्याचा स्वामी आहें. आणि त्याची वाटेल तशी वासलात लावण्याचा मला पूर्ण अधिकार आहे.

तेज०:—महाराज, अविचारानें या भलत्याच हट्टास पेटूं नका. राज्यदान करून कदंबाच्या स्वातंत्र्याचा मातंगेश्वराच्या पायांवर बली देण्यास आपण सिद्ध झालांत तर स्वातंत्र्यप्रिय कादंब आपणांस आपल्या राजसिंहासनावरून ओढून काढण्यास क्षणभरही मागेंपुढें पहाणार नाहींत.

सौदा०:—काय छाती आहे लोकांची महाराजांना कदंब-राजसिंहासनावरून ओढून काढण्याची? नुस्ते असे शब्द तोंडावाटे काढतील तर राज-

द्रोही बंडखोर म्हणून भर चव्हाट्यावर त्यांचीं डोकीं मेखसूखालीं बिन-दिक्कत फोडलीं जातील.

**तेज०**:—स्वतंत्रता देवीच्या निस्सीम उपासकांना चव्हाटे आणि मेखसू यांचा डर स्वप्नांतही शिवत नाहीं. स्वातंत्र्याच्या महामंत्राचा पहिला वर्ण उच्चारताच ते आपल्या पंचप्राणांचें उदक मृत्यूच्या हातावर सोडून मोकळे झालेले असतात. तेव्हां अशा निर्भय स्वातंत्र्यभक्ताच्या स्वातंत्र्याचा तुम्ही परक्यांच्या पायांशीं खून पाडण्यास तयार व्हाल तर मेखसू आणि चव्हा ट्याच्या साऱ्या धमक्या जागच्या जागीं जिरून जाऊन तुम्हा सर्व देशद्रोह्यांचीं मस्तकें एक दिवस नगराच्या वेशीवर टांगलीं जातील हें खूप समजून असा.

**सौदा०**:—ठीक आहे. तसा प्रसंग येईल तेव्हां आम्हीही पाहून घेऊं. घोडामैदान नजीकच आहे.

**काल०**:—मला वाटतें वाद पुष्कळ झाला. बोलण्यापेक्षां तेजस्विनी ताईसाहेबांनीं काय करावयाचें तें करूनच दाखवावें. शब्दांपेक्षां कृतीचें मोल जास्त आहे. तेव्हां सरकार, बोला. आतां आपला अखेरचा निकाल काय असेल तो एकदांचा सागून टाका. म्हणजे त्याप्रमाणें आम्हांला पुढच्या व्यवस्थेस लागण्यास ठीक पडेल.

**तेज०**:—अखेरचा निकाल दुसरा काय असावयाचा? युद्ध हाच अखेरचा निकाल आणि त्याच्या तयारीला आपण एकदम लागलें पाहिजे.

**सौदा०**:—काय? महाराज, युद्ध हाच का अखेरचा निकाल?

**कंदर्प०**:—युद्ध? ( विचार करून ) हो–युद्धच.

**काल०**:—काय? युद्धच? महाराज, आपण शुद्धीवर आहांत का?

**कंदर्पः०**—( फिरून विचार करून ) छे–युद्ध नाहीं.

**तेज०**:—काय? युद्ध नाहीं!

**कंदर्प०**:—( विचारपूर्वक ) नाहीं. युद्ध नाहीं. तह हा माझा अखेरचा निकाल.

**काल०**—तर मग सरकारांनीं या कागदावर ताबडतोब सही करावी. वेळ अगदीं भरत आली आहे.

**कंदर्प०**:—आणा तो कागद इकडे ( कालकूट त्यास कागद देतो.)

तेज०:—महाराज, एक क्षणभर थांबा. त्या शरणागतीच्या तहनाम्यावर आपल्या हस्ताक्षराची मुद्रा करण्यापूर्वीं आपल्या हातानें आपण माझ्या हातांत घातलेली ही आपली प्रणयमुद्रा आपण परत घ्या ( बोटांतील आंगठी काढून त्याच्यापुढें धरते ).

कं०:—( भांबावून ) काय ? प्रणयमुद्रा परत घेऊं ? तेजस्विनी-तेजस्विनी—हा काय अविचार तूं आरंभिला आहेस ?

तेज०:—अविचार म्हणा—अनाचार म्हणा—नाहीं तर अत्याचार म्हणा. पण स्वातंत्र्यद्रोही देशघातक्याच्या पापी प्रणयाचें हें अमंगल चिन्ह निर्लज्जपणानें आपल्या करांगुलीवर मिरविण्याला ही तेजस्विनी अतःपर तयार नाहीं ( आंगठी त्याच्या आंगावर फेंकते ).

कं०:—अगे वेडे, प्रणयाचा स्वातंत्र्याशीं अर्थाअर्थी संबंध काय ? प्रणय हा विषय वेगळा—स्वातंत्र्य हा विषय वेगळा.

तेज०:—नाहीं, स्वातंत्र्य हा पुरुषाचा पराक्रम आहे आणि पराक्रम हाच स्त्रियांच्या प्रेमाचा विषय आहे. जेथें स्वातंत्र्य नाहीं तेथें पराक्रम नाही आणि जेथे पराक्रम नाहीं तेथे प्रेम नाहीं. तेव्हां माझ्या प्रेमाची जर आपणांस अपेक्षा असेल तर आपण स्वतंत्र राहण्याचाच निश्चय केला पाहिजे.

कं०:—स्वतंत्र राहण्याचा निश्चय केला पाहिजे असें म्हणण्यापेक्षां मरण्याचाच निश्चय केला पाहिजे असेंच स्पष्ट कां सांगत नाहींस ?

तेज०:—सांगत्यें—अगदीं स्पष्ट सांगत्यें. आपल्याला जर माझें प्रेम पाहिजे असेल तर स्वातंत्र्यप्रीत्यर्थ मरण्याचाच निश्चय आपण केला पाहिजे नाहींतर माझ्या प्रेमाची आशा आपण सोडून दिली पाहिजे. ही तेजस्विनी या जन्मांत कधीं विवाहबंधनानें बद्ध व्हावयाचीच असेल तर ती आपल्या देशाचें स्वातंत्र्यरक्षण करण्यासाठीं निधड्या छातीनें मृत्यूशीं झगडण्यास सिद्ध होणाऱ्या बहाद्दर रणमर्दाशींच बद्ध होईल. परक्यांचे लत्ताप्रहार भूषणानें मस्तकावर मिरविणाऱ्या गुलामाची गुलाम ती केव्हांही होऊन राहणार नाहीं—महाराज—

१० पद गझल. "पहिले तो ले लिया दिल०-"

स्वातंत्र्य हेंच ज्याचें ॥ आजन्म ब्रीद साचें ॥
रण-रागिणी वराया ॥ सामर्थ्य एक त्याचें ॥ ध्रु० ॥
परदास्य-लांछनाची ॥ तिळ लाज ज्यास नाहीं ॥
धिक्कार त्या पशूला ॥ धिक् प्रेमदान त्याचें ॥ १ ॥
तलवार काल-कन्या ॥ क्लीबा न अंगिकारी ॥
रणरंगि वीरसंगें ॥ घनघोर नाच नाचे ॥ २ ॥
निर्लज्ज नीच ललना ॥ भजताति भेकडासी ॥
नच मानिनी जुमानी ॥ नादान प्रेम त्याचें ॥ ३ ॥

**कंदर्प**:—असेंच असेल तर माझा इलाजच खुटला. मला आतां तुझ्या प्रेमासाठीं मृत्यूच्या गळ्याला मिठी मारणें भागच आहे! ठीक आहे. तुझी तशी इच्छाच आहे तर होऊं दे. हा पहा, तुझ्या प्रेमाखातर झालों मी मरणाला तयार.-सोडलें आपल्या प्राणांवर पाणी. (कालकूटास) कालकूट, हा कागद घ्या.-मला याच्यावर सही करावयाची नाहीं-(कागद परत देऊं लागतो).

**कालकूट**:—(संतापाचा आव आणून) फेंकून द्या. मला त्या कागदाची जरूर नाहीं; आणि आपल्या प्रधानकीची त्याहून जरूर नाहीं. यापुढें मी आपला प्रधान नाहीं आणि आपला कोणताही हुकूम यापुढें माझ्याकडून पाळला जाणार नाहीं.

**मंत्रि**:—आम्हीही पुढें सरकारांची नोकरी करूं चहात नाहीं.

**हालाहल**:—मींही यापुढें सरकारांच्या नोकरींत रहाण्यास तयार नाहीं. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. माझ्यासारख्या सेनापतीची सल्ला झुगारून आपण लढाईला तयार झालांत ही गोष्ट लष्करी शिस्तीच्या धोरणानें मला अगदीं नापसंत आहे.

**कंदर्प०**:—(घाबरून) अरेच्या! हें काय? तुम्ही सारेच मला सोडून चाललांत:—

**कालकूट**:—करावयाचें काय? जेथें आमच्या शहाणपणाची जरूर नाहीं.

**हालाहल**:—जेथें आमच्या पराक्रमाची पर्वा नाहीं.—

**मंत्रि**:—जेथें आमचें निदान फोल ठरलें!—



**तेजस्विनीः**—स्वातंत्र्यापीत्यर्थ मरण्याचाच निश्चय आपण केला पाहिजे. (पान २९).

**हालाहल**:--इमान कवडीमोल ठरलें !--

**काल०**:—तेथें मुर्दाडाप्रमाणें राहण्यांत अर्थ काय? (सारे जाऊं लागतात).

**कं०**:—(गोंधळून) कालकूट–हालाहल--मंत्रि--थांबा--थांबा.—

**तेज०**:—थांबा कशाला? जाऊं द्या.–खुशाल जाऊं द्या त्यांना. त्यांच्यावांचून आपलें कांहींएक अडणार नाहीं.

**कं०**:—(वैतागून) अडणार नाहीं कसें? हे सारे माझे आधारस्तंभ! हे गेले म्हणजे माझे हातपायच मोडले! कालकूट–हालाहल–मंत्रि–थांबा–थांबा.—

**काल०**:—नाहीं. महाराजांना आमच्या सांगण्याप्रमाणें वागावयाचें नाहीं. मग आम्ही थांबून काय करावयाचें? आम्ही गेल्यानें महाराजांचें कांहींएक अडावयाचें नाहीं. तेजस्विनीताईसाहेब प्रधानकीचीं वस्त्रें अंगावर चढवून राज्यकारभार पहातील आणि हातांत तलवार धरून लढाया मारतील.—

**तेज०**:— होय. तेजस्विनी हें सर्व करील. आपण अगदीं निर्धास्त असा.

**काल०**:—झालें. ताईसाहेबांनीं सर्वाधिकार आपल्या हातीं घेतले. आतां येथें आमची कांहीं जरुरी नाहीं (पुनः जाऊं लागतात).

**कं०**:—(त्यांना अडवून) अहो, असें कानांत वारें भरल्यासारखें काय करतां! तुमच्या साऱ्यांच्या म्हणण्याप्रमाणें वागण्याला मी तयार आहें.

**सौदा०**:—आपल्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. या क्षणीं असें बोलत आहांत;—पुढच्या क्षणीं याच्या अगदीं उलट बोलूं लागाल. तेव्हां निष्कारण दुसऱ्यांना त्रास कां? कालकूट, हालाहल, मंत्रि जा तुम्ही. यांच्या बिलकूल नादीं लागूं नका.--

**कं०**:—अगे--अगे--तूं सुद्धां आगींत तेल ओतूं लागलीस? कालकूट थांबा. हिचें बिलकूल ऐकूं नका. हें घ्या. तुमच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याचें मी तुम्हांला वचन देतों.—(वचन देऊं लागतो).--

**सौदा०**:—कोरडें वचन काय करावयाचें! खरोखरच यांच्या तंत्रानें वागण्याची आपली तयारी असेल तर तो कागद घ्या आणि त्यावर सही करा, म्हणजे त्यांना आपला विश्वास पटेल.

**कं०**:—ठीक आहे. आण तो कागद इकडे आणि दौत-कलम घे (कागद घेऊं लागतो).

**तेज०**:—(त्वेषानें) तर मग महाराज, यापुढें मी आपली भावी पत्नी नाहीं आणि आपण माझे भावी पति नाहीं. इतकेंच नव्हे तर आपलें राजा आणि प्रजा हें नातेंही यापुढें राहिलें नाहीं. आपण त्या कागदावर आपल्या हस्ताक्षराची मुद्रा केलीत, की आपल्या व माझ्या वैराला प्रारंभ झाला म्हणून समजा.

**कं०**:—वैर कर-विरोध कर-प्रतिकार कर-काय वाटेल तें कर. पण तुझ्या नादीं लागून आपला सोन्यासारखा जीव वाऱ्यावर टाकावयाला मी कांहीं तयार नाहीं (कागदावर सही करूं लागतो).

**तेज०**:—(दुःखानें स्वगत) अरेरे! झाला-झाला! कदंबाच्या राजसत्तेचा लोप झाला-स्वातंत्र्यलक्ष्मीचें सौभाग्य नष्ट झालें. स्वर्गाचें स्मशान होऊन सर्वत्र गुलामगिरीचा गडद अंधःकार पसरला!

**कं०**:—(कागदावर सही करून) कालकूट-घ्या हा कागद. झालें आतां तुमच्या सर्वांच्या मनासारखें?

**काल०**:—झालें.

**तेज०**:—[संतापून आवेशानें] हे स्वातंत्र्यद्रोही-देशघातक्या-नराधमा, तूं जरी आपल्या प्रजाजनांचा विश्वासघात करून मातंग राजसिंहासनापुढें कदंब राष्ट्राचा बली दिला आहेस तरी लक्षांत ठेव, या तेजस्विनीच्या देहांतील रक्ताचा अखेरचा थेंब जमिनीवर पडेपर्यंत महाराज प्रतापादित्यांच्या या पुण्य मातृभूमीच्या पायांत परदास्याच्या शृंखला कदापि-कदापि-कदापि-पडणार नाहीं.—

११ पद. "श्याम कवचा वरि०-"

**कालमुखिं हा बलि देउनिया मत्प्राण रुधिरमय दारुण रणांगणीं ॥ ध्रु० ॥ विजया देवी स्वतंत्रता पूजिन भावें अमर-भुवन-विहारिणी ॥ १ ॥**

(त्वेषानें निघून जाते).

—पडदा पडतो.—

**अंक पहिला समाप्त.**

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

(**स्थळ:**—राजवाड्यांतील एक भाग. पशुपाल व तेजस्विनीच्या कांहीं दासी.)

**पशुपालः**—( आवेशानें ) एक अक्षर तोंडावाटे काढूं नका. मी या वेळीं तुम्हाला महाराजांची भेट घेऊं देणार नाहीं. बस्. हम् करे सो कायदा! भोलेनाथ!

**१ ली दासी**—अहो, पण तेजस्विनी ताईसाहेब राजवाड्यांतून निघून गेल्या म्हणजे काय करणार?

**पशुपालः**—तें कांहीं मी जाणत नाहीं. तेजस्विनी जावो नाहीं तर राहो, मला त्याची पर्वा नाहीं. फक्त तिच्या जाण्याची बातमी महाराजांच्या कानांवर जाऊं द्यावयाची नाहीं अशी सौदामिनी राणीसाहेबांची मला सक्त ताकीद आहे तेवढी बरोबर पाळणें एवढें माझें काम. दुसरें तिसरें मी कांहीं ओळखीत नाहीं. तेव्हां चला, येथून ताबडतोब चालत्या व्हा. तुम्हाला मी महाराजांची भेट घेऊं देणार नाहीं. बस्. मेरे मुरगीकी एकहि टांग. भोलेनाथ!

**२ री दासीः**—( काकुळतीनें ) अहो, महाराजांना ही बातमी आम्ही कळविली नाहीं तर महाराज आमच्यावर खपा होतील.

**पशुपालः**—होऊं देत-होऊं देत—महाराज तुमच्यावर खपा होतील तर खुशाल होऊं देत. त्यांत माझें कांहीं एक बिघडत नाहीं. गांव जळाला तरी हनुमान निराळा. बस् भोलेनाथ!

**३ री दासीः**—तुमचें ठीक आहे पण आमचीं डोकीं उडविलीं जातील त्याबद्दल जबाबदार कोण?

**पशुपालः**—त्याबद्दल जबाबदार मी. तुमची डोकीं उडविलीं गेलीं तर डोकीं उडविलीं गेल्यानंतर सरकारांत तुम्ही बेधडक माझ्यावर फिर्याद गुदरा. तुमच्या उडालेल्या डोक्यांची जबाबदारी मी आपल्या शाबूत डोक्यावर मोठ्या

आनंदानें घेईन. पण आतां येथें एक क्षणभरसुद्धां थांबू नका. तेजास्विनीच्या विरहानें महाराजांची तब्येत अगदीं हैराण झाली आहे. या वेळीं तेजस्विनीच्या जाण्याची बातमी त्यांच्या कानांवर घालणें म्हणजे आगींत तेल ओतण्यासारखें आहे. तेव्हां आतां, माझ्या चतुर छबेल्यांनो, मुकाट्यानें परत जा आणि महाराजांची प्रकृति दुरुस्त झाली म्हणजे मग फिरून या. मग मी तुम्हाला त्यांना भेटण्याची जरूर परवानगी देईन. तेव्हां आतां उगाच मला सतावूं नका. माझें डोकें एक वेळ भडकलें कीं लौकर ठिकाणावर यावयाचें नाहीं; आणि मग तुमच्यावर मोठा भयंकर प्रसंग ओढवेल. तेव्हां हा पशुपाल एखाद्या शांतदांत मुनीप्रमाणें शांत आहे तोंपर्यंत आपले जीव घेऊन त्याच्या नजरेच्या टापूबाहेर व्हा. अगे, शिर सलामत तो पगडी पचास. भोलेनाथ!

**१ ली दासीः**—नाहीं. आमचीं शिरें सलामत राहिलीं नाहींत तरी बेहेत्तर; पण महाराजांच्या कानांवर ही बातमी घातल्यावांचून आम्ही येथून हालणार नाहीं.

**पशुपालः**—( रागावून ) हालणार नाहीं! तेजस्वीनी अंगांत संचरली वाटतें? पण याद राखून ठेवा. हा पशुपाल असल्या गमज्यांना दाद देणार नाहीं. मी सुद्धां तेजस्वीनीसारखाच जिवंत आग्यावेताळ आहे. संतापलों तर सारें ब्रह्मांड एका क्षणांत जाळून भस्म करून टाकीन. मग तुमच्यासारख्या चार दोन कोंवळ्या नाजुकसाजुक पोरीसोरींची कथा काय? तेव्हां निमूटपणें येथून बऱ्या बोलानें चालत्या व्हा. नाहक त्रास देऊन मला रागाला आणूं नका. जन्मभर तुम्ही माझ्याशीं येथें अशी हुज्जत घालीत बसलांत तरी मी तुम्हाला या वेळीं महाराजांना भेटूं देणार नाहीं. मग शेंडी तुटो नाहीं तर पारंबी तुटो भोलेनाथ!

**२ री दासीः**—( चिडून ) पशुपाल, तुम्ही केवढेंही उसनें अवसान अंगांत आणलेंत तरी आम्ही कांहीं तुम्हाला भिणार नाहीं. ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी आहेत. मानेवर केंसांचें जंगल वाढविलें म्हणून नराचा कांहीं नरसिंह होत नाहीं. तुम्हीं जसें राजवाड्यांतील खुषमस्करे आहांत तशा आम्हीही राजवाड्यांतीलच दासी आहोंत. तेव्हां मुकाट्यानें आम्हांला आंत जाऊं द्या. नाहींतर आम्ही तुमच्याशीं धिंगामस्ती करून आंत जाऊं—सोडणार नाहीं. लक्षांत ठेवा.

**पशुपालः**—( रागानें ) धिंगामस्ती करून आंत जाऊं ? अगे मस्तवाल बटकींनो, माजलांत काय ? ठीक आहे. तर मग होऊंच द्या आतां तुमची आमची कुस्तंकुस्ती. हां–चला. ही मी आपली तरवार म्यानांतून उपसली. करा आतां माझ्याशीं धिंगामस्ती आणि शिरा आंत. मारे एकेकीला सपशेल लंबी केली नाहीं तर फिरून बायकांशीं लढणार नाहीं. चला–अस्सल बायका असाल तर सरा पुढें आणि मरा ठार. हा वीर तुमच्यासारख्या निःशस्त्र बायकांवर वार करण्यासाठीं तलवार उपसून पवित्रा ठोकून एका पायावर तयार आहे. जय हरहर महादेवकी जय–भोलेनाथ ! ( पवित्र्यावर उभा राहतो. तिघी त्यास धरावयास पुढें सरसावतात ).

**पशुपालः**—हां–हां हां–हा.-तीन निःशस्त्र बायकांनीं एकत्र होऊन एकदम एका सशस्त्र पुरुषावर हल्ला चढाविणें हें धर्मयुद्ध नाहीं. ही दंडेली आहे–हा जुलूम आहे–हा अधर्म आहे. एकेक अंगावर या आणि मग माझ्या तलवारीचा पराक्रम पहा. माझ्या हातांत तलवार चमकत असतां तुमच्यापैकीं कोणीही एकटीनें बिन तलवारीनें माझा पराजय केला तर मी तुम्हांला बिन-हरकत शरणचिठ्ठी लिहून देण्यास तयार आहें. मग तुम्ही खुशाल आंत जा –बाहेर रहा–काय वाटेल तें करा. मी एक अक्षर तोंडावाटें काढणार नाहीं. परंतु माझ्या तलवारीखालीं तुम्ही साऱ्याजणीं ठार मरून पडलांत तर मात्र मी तुम्हांला गचांड्या देऊन येथून परत घालवीन. बिलकूल गय करणार नाहीं. लक्षांत ठेवा. हं–चला–होऊं द्या. आतां धर्मयुद्धानें तुमचे आमचे दोन दोन हात. चला-या. एकेक पुढें या. जय हरहर महादेव की जय ! भोलेनाथ ! ( तलवार फिरवूं लागतो. इतक्यांत कंदर्प व शिशुपाल प्रवेश करतात ).

**कंदर्पः**—काय गडबड आहे ?

**१ ली दासीः**—( पुढें होऊन ) सरकार आम्ही आपल्या भेटीस आलों तर पशुपाल आम्हाला आपली भेटच घेऊं देत नाहींत.

**पशुपालः**—अलबत्. भेट कशी घेऊं देईन ? तेजस्विनी राजवाडा सोडून निघाली आहे ही बातमी महाराजांच्या कानांवर पडूं द्यायची नाहीं अशी सौदामिनी राणीसाहेबांची मला जर सक्त ताकीद आहे तर ती बातमी सरकारांच्या कानांवर मी तुम्हांला कशी घालूं देईन ? भोलेनाथ !

**कंदर्पः**—काय ? तेजस्विनी राजवाडा सोडून खरोखरच चालली ?

**१ ली दासीः**—होय सरकार. आणि म्हणूनच आम्ही इतक्या लगबगीनें सरकारांच्या पायांकडे धांवत आलों.

**पशुपालः**—आणि म्हणूनच मी तरी यांना अडथळा केला व करीत आहे. तेजस्विनी राजवाडा सोडून जाणार ही बातमी यांना मी आपल्या कानांवर कधींही घालूं देणार नाहीं. भोलेनाथ!

**कंदर्पः**—बेअक्कल-पशु आहेस शुद्ध—

**पशुपालः**—अलबत्, आहेच. नाहीं कोण म्हणतो? हुकुमाच्या ताबेदाराला स्वतःच्या अकलेशीं फारकत करावीच लागते. नाहीं तर नोकरींत त्याचा टिकाव कसा लागणार! ताबेदार तट्टू आणि बजरबट्टू असें दुनियाच म्हणते. भोलेनाथ!

**कंदर्पः**—( दासींस ) चला. मला तिच्याकडे घेऊन चला.

**१ ली दासी**—चलावें सरकारांनीं ( जाऊं लागतात ).

**शिशुपालः**—सरकारांनीं एक क्षणभर थांबावें.

**कंदर्पः**—थांबावें? कशाकरितां?

**शिशुपालः**—सरकारांना तेजस्विनीच्या भेटीस जाऊं देऊं नये असें शृगालराजांकडे जातांना सौदामिनी राणीसाहेबांनीं मला बजावून ठेविलें आहे.

**पशुपालः**—अगदीं बरोबर.मलासुद्धां राणीसाहेबांची अशीच ताकीद आहे.

**कंदर्पः**—सौदामिनीचा मी गुलाम आहे कीं काय? अमक्याची भेट घ्या, तमक्याची घेऊं नका असें मला सांगणारी सौदामिनी कोण? मी राजा आहे. स्वतःचा व येथील माणसांचा मालक आहे.माझ्यावर कोणाचीही सत्ता चालणार नाहीं. तेजस्विनीला भेटण्याची माझी इच्छा आहे आणि तिची भेट मी घेणारच. चला गे-मला तेजस्विनीच्या महालाचा रस्ता दाखवा ( जाऊं लागतात ).

**शिशुपालः**—नका-महाराज, नका-जाऊं नका. आम्ही गरीब लोक. आपण तेजस्विनीकडे गेलांत तर राणीसाहेबांचा आमच्यावर कोप होईल.

**पशुपालः**—आणि त्या आम्हां गरीबांना लाथांखालीं तुडवून काढतील. तेव्हां आम्हा गरिबांवर दया करा आणि सौदामिनी राणीसाहेब परत येई-पर्यंत तरी येथून हालूं नका. त्या आल्यावर आपल्याला दाही दिशा मोकळ्या आहेत. मग आपण खुशाल वाटेल तो गोंधळ घाला. आम्ही एक अक्षर

तोंडावाटें काढूं–तर भोलेनाथ! पण आतां कृपा करून कोठें जाऊं नका. ( दोघे त्याला आडवे होतात ).

**कंदर्पः**––बेवकूब–फाजील कुठले! चला दूर व्हा–माझ्या वाटेंत आडवे येऊं नका ( त्यांना ढकलून निघून जातो ).

**शिशुपालः**––गेले–गेलेच निघून ते. पशुपाल, आतां, काय करावयाचें?

**पशुपालः**––आतां "पांचजन्याय विद्महे पावमानाय धीमहि" करावयाचें दुसरें काय? हं–कर सुरुवात. तूं षड्ज लावलास कीं मी मध्यमपंचमाचा जोड देतों. साऱ्या राजवाड्यांत मारे बोंबाबोंब उडवून देऊं. भोलेनाथ!

**शिशुपालः**—(पाहून) अरे–पण थांब. ती पहा–ती लष्करी शिस्त इकडे येत आहे. त्यांच्या कानांवर आपण ही वार्ता घालूं म्हणजे ते कांहीं तरी शक्कल काढतील.

**पशुपालः**—काय? हा म्हशीचा प्राणनाथ शक्कल काढणार? शाबास! तूं सुद्धां त्याचाच भाऊबंद दिसतोस. अरे बाबा, शक्कल काढावयाला अक्कल लागते अक्कल. काय समजलास? भोलेनाथ!

**शिशुपालः**—मूर्खा, मोठ्या लोकासंबंधानें असें मोठ्यानें बोलूं नये.

**पशुपालः**—देहाच्या विस्तारावरून अकलेची मोजदाद करावयाची असेल तर हा फारच मोठा माणूस आहे खरा. पण हें बघ, या हिशेबानें बैलरेडे याच्याहीपेक्षां मोठे गृहस्थ ठरतील. भोलेनाथ!

**शिशुपालः**—चुप बैस. तुझ्या जिभेला मुळीं हाडच नाहीं. त्यांच्या कानावर हे शब्द पडले तर तुझीं माझीं हाडें घुसळलीं जातील. ( हालाहल शिपायांसह लगबगीनें प्रवेश करतो.)

**हालाहलः**––ए दरबारी तट्टांनो, तेजस्विनी आंत आहे का?

**शिशुपालः**––आंत कोणीच नाहीं.

**हालाहलः**––कोणी आहे कीं नाहीं हें मीं तुला विचारलें नाहीं. तेजस्विनी आहे का हें विचारलें. तेव्हां त्याचा जबाब मला दे. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. मला विचारल्या प्रश्नाचें त्याच शब्दांत उत्तर पाहिजे. अशीं दरबारी भाषेच्या चलाखीचीं उत्तरें नकोत. बोल–तेजस्विनी आंत आहे का?

**पशुपाल:**—कोणींच नाहीं, यांत तेजस्विनी नाहीं हें आलेंच. भोलेनाथ!

**हालाहल:**—अरेच्या! पुनः दरबारी लटपट! लष्करी शिस्तीचा सरळ सीधा जबाब नाहीं.

**शिशुपाल:**—सेनापतीसाहेब, रागावूं नका. तेजस्विनी ताईसाहेब आंत नाहींत.

**हालाहल:**—मूर्खा, तेजस्विनी ताईसाहेब नको आहेत मला. नुस्ती तेजस्विनी पाहिजे आहे. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. हुकुमांत असेल तेवढेंच नांव मी घेणार. ताईसाहेब–बाईसाहेब–आईसाहेब मी कांहीं ओळखीत नाहीं. तेव्हां बोल. तेजस्विनी आंत आहे का सांग.

**शिशुपाल:**—तेजस्विनी आंत नाहीं.

**पशुपाल:**—आंत तेजस्विनी नाहीं. भोलेनाथ!

**हालाहल:**—हां—आतां कसें बरोबर लष्करी शिस्तीला धरून उत्तर दिलेंत. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. तेव्हां मला अशीं लष्करी शिस्तीचीं उत्तरें आवडतात. तुमच्या दरबारी नखऱ्याचीं नागमोडी उत्तरें आवडत नाहींत.

**पशुपाल:**—गाढवाला गुळाची चव कोठून असणार? भोलेनाथ!

**हालाहल:**—पण हें पहा–हें तुम्ही खरें सांगत आहांत का ही तुमची निव्वळ दरबारी थाप आहे?

**शिशुपाल:**—दरबारी थाप असेल तर वाटेल त्याची शपथ घ्यावयाला आमची तयारी आहे.

**पशुपाल:**—बिनदिक्कत तयारी आहे. भोलेनाथ!

**हालाहल:**—अरे! पुनः आलांत तुम्ही आपल्या पहिल्या वळणावर. पण जाऊं दे. वांकड्या चालीच्या दरबारी जिभांना लष्करी शिस्तीची सरळ चाल लवकर गठावयाची नाहीं. काय म्हणता? शपथ घ्यावयाला तुमची तयारी आहे?

**शिशुपाल:**—बेशक आहे.

**पशुपाल:**—बेलाशक आहे–बेधडक आहे. भोलेनाथ!

**हालाहल:**—तर मग घ्या पाहूं आपल्या बापांच्या शपथा.—



पशुपालः---आमचे बाप तरी कोठें जिवंत आहेत ! (पान ३९).

**पशुपालः**---बापांच्याच काय, पण बापांच्या बापांच्या शपथा घेण्याला-सुद्धां आमची ना नाहीं. भोलेनाथ !

**हालाहलः**---बापांच्या बापांची शपथ नको आहे मला. मेल्या माणसांच्या शपथा घेऊन मला फसवूं पहातां काय ?

**पशुपालः**---पण आमचे बाप तरी जिवंत कोठें आहेत ? ते सुद्धां केव्हांच मरून पार झाले आहेत ! भोलेनाथ !

**हालाहलः**---अरेच्या ! असें आहे काय ? तर मग तुम्ही आतां स्वतः-च्याच शपथेवर खरें काय तें सांगा. बोला, तेजस्विनी आंत आहे का ? अगदीं स्वतःच्या शपथेवर सांगा.

**पशुपालः**--- पण आम्ही स्वतः जिवंत आहोंत ही तरी सेनापतीसाहेबांची खात्री आहे का ?

**हालाहलः**---होय. खरेंच. तोसुद्धां संशयच आहे. तुमच्यासारखे मुर्दाड दरबारी हे जिवंत असून मेल्यासारखेच आहेत. पण कांहीं हरकत नाहीं. मेल्या मुडद्यांच्या शपथेपेक्षां तुमच्यासारख्या जिवंत मुडद्यांची शपथ चालेल मला. घ्या–आपली स्वतःची शपथ घ्या.

**पशुपालः**---( शिशुपालास ) ए जित्या मुडद्या, तूं घे पहिल्यानें. मी तुला मागून अनुमोदन देतों. भोलेनाथ !

**शिशुपालः**---नाहीं. तूंच घे पहिल्यानें. मी तुला अनुमोदन देतों.

**पशुपालः**---अरे बाबा, मुर्दाड जिवंतपणांत तूं माझ्यापेक्षां श्रेष्ठ आहेस. तेव्हां तुझा मान पहिला आहे. हं, चल हो पुढें. पुढाऱ्यानें असें मागें पाऊल घेणें शोभत नाहीं. भोलेनाथ !

**शिशुपालः**---( हालाहलास ) सेनापतिसाहेब, मी अगदीं स्वतःच्या-अगदीं जिवंत स्वतःच्या--शपथेवर सांगतों कीं तेजस्विनी आंत नाहीं.

**पशुपालः**---माझें शिशुपालास तंतोतंत अनुमोदन आहे. भोलेनाथ !

**शिशुपालः**---आतां झाली आपली खात्री ?

**पशुपालः**---काय ? झाली आपली खात्री ? का पुनः शपथ घेऊन पुनः अनुमोदन देऊं ? भोलेनाथ !

**हालाहलः**—खात्री ? होय—झालीच म्हणावयाची. पण छे, तुम्हा मुर्दाड दरबारी लोकांच्या शपथांवरसुद्धां विश्वास ठवणें धोक्याचें आहे. तेव्हां तसें नाहींच कामाचें. मी स्वतःच आंत जाऊन पाहून खात्री करून घेतों.

**दोघेः**—ठीक आहे.आमचें सपशेल अनुमोदन आहे.(हालाहल आंत जातो).

**पशुपालः**—शिशुपाल, पाहिलेंस,—मी मघांशीं वर्णन केलें तें बरोबर आहे कीं नाहीं ? अरे बाबा, ब्रह्मदेवानें अकलेची खैरात केली तेव्हां हा डुक्कर मुळीं तेथें हजरच नव्हतां त्याला उपाय काय ? हजीर सो वजीर और गैरहजीर सो गद्धा असा मुळीं कायदाच आहे. भोलेनाथ !

**शिशुपालः**—अरे, पुनः तोंड सोडलेंस. तुला भान कसें रहात नाहीं ? तो पहा—तो खवीस आला परतून बाहेर. तेव्हां जरा जीभ आवरून ठेव. नाहीं तर तुझी आणि माझी गठडीच आवळील तो.

**पशुपालः**—ठीक आहे. आतां अगदीं मेल्या मुडद्यासारखा डोळे मिटून उभा रहातों. भोलेनाथ !

**शिशुपालः**—डोळे मिटून काय करावयाचें ? तोंड मिटून उभा रहा.

**पशुपालः**—ठीक आहे. जशी तुझी आज्ञा. डोळे आणि तोंड दोन्ही मिटून उभा रहातो. म्हणजे पहावयाला नको—आणि पाहिलें तरी बोलावयाला तर नकोच नको. भोलेनाथ ! ( तसें करतो. हालाहल प्रवेश करतो ).

**शिशुपालः**—काय ? आहे कोणी आंत ?—

**हालाहलः**—कोणी आहे कीं नाहीं हें पाहावयास मी गेलों नव्हतों. तेजस्विनी आंत आहे कीं नाहीं हें पहावयाला मी गेलों होतों.

**शिशुपालः**—मग ? आहे तेजस्विनी आंत ?

**हालाहलः**—ज्याअर्थी ती तेथें आढळली नाहीं त्याअर्थी ती तेथें नाहीं असेंच म्हणणें भाग आहे. तुम्ही लोक मला सच्चे दिसता.

**पशुपालः**—( स्वगत ) आंधळ्यासी जग सारेंचि आंधळे, भोलेनाथ !

**हालाहलः**—मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. मला सच्चेपणा फार प्यारा आहे.

**शिशुपालः**—अलबत्. असलाच पाहिजे.

**हालाहल:**––आणि दरबारी असून तुम्ही सच्चेपणानें वागलांत––

**शिशुपालः**––होतें चुकून कधीं कधीं असें.

**पशुपालः**––(स्वगत) कपिलाषष्ठीचा योग येतो केव्हां केव्हां ! भोलेनाथ !

**हालाहल:**––तेव्हां त्याबद्दल मी तुमचे मनःपूर्वक आभार मानतों.

**पशुपालः**––( उघड ) माझें पूर्ण अनुमोदन आहे. भोलेनाथ !

**शिशुपालः**–आणि या आभाराबद्दल मीही आपलें उलट आभार मानतों.

**पशु०:**–या उलट आभारालाही माझें पूर्ण उलट अनुमोदन आहे. भोलेनाथ!

**हालाहलः**––ठीक आहे. मी पुनः तुमचा आभारी आहे. (शिपायांस) चलारे.

**शिशुपालः**––सेनापति साहेबांच्या कानांवर आम्हाला एक बातमी घालावयाची आहे.

**हालाहलः**––बातमी घालावयाची आहे ?

**पशुपालः**––होय. एक खबर घालावयाची आहे. भोलेनाथ !

**हालाहलः**––खबर दरबारी आहे का लष्करी आहे ?

**शिशुपालः**––दरबारी आहे.

**हालाहलः**––दरबारी असेल तर प्रधानजींच्या कानावर घाला.

**पशुपालः**––दरबारी नाहीं–लष्करी आहे. भोलेनाथ !

**हालाहलः**––एक म्हणतो दरबारी–एक म्हणतो लष्करी. खरें काय समजावें यांत ?

**शिशुपालः**––दोन्ही खरींच आहेत.

**हालाहलः**––दोन्ही खरींच आहेत ?

**पशुपालः**––होय. दोन्ही खरींच आहेत. फक्त मतभेदाचा प्रश्न आहे.

**हालाहलः**––मतभेद कसला ?

**शिशुपालः**––महाराजांची स्वारी तेजास्विनीकडे गेली ही खबर मी दरबारी समजतों––

**पशुपालः**––आणि मी लष्करी समजतों. एवढाच मतभेद. बाकी महाराजांची स्वारी तेजस्विनीकडे गेली ही खबर मात्र खरीच आहे. भोलेनाथ !

हालाहल:—तर मग तुमचा मतभेद कायम असेपर्यंत मला तुमची खबर कानावर घेतां येत नाहीं. शिवाय असल्या वादग्रस्त खबरी ऐकण्याला मला तूर्त अवकाशही नाहीं. तेजस्विनीला ताबडतोब कैद करण्याबद्दल राणी-सरकाराचा मला हुकूम झाला आहे. तेव्हां मला ताबडतोब तिचा तलास लांवून तिला गिरफ्दार केलें पाहिजे. तुमचा मतभेद मिटून तुमची खबर लष्करी ठरली तर मला येऊन भेटा, मग मी ती जरूर ऐकून घेईन. (शिपा-यांस ) चलारे,–( शिपायांसह जातो ).

शिशुपाल:—पशुपाल, तूं अखेरीस तोंड उघडलेंस.

पशुपाल:—अरे तुझें तोंड बंद होण्याची पाळी आली तेव्हां मला आपली प्रतिज्ञा मोडणें भागच पडलें. भक्तासाठीं संकटांत उडी घातली नाहीं तर तो देव कसला ? भोलेनाथ!

शिशुपाल:—देव कसला आणि दानव कसला ? जित्याची खोड मेल्या-शिवाय जात नाहीं हेंच खरें.

पशुपाल:—आणि मेल्याची खोड तरी जित्याशिवाय जाते कोठें ? कोण ताही मेला पुनः जन्माला आल्याशिवाय आपलें थडगें सोडून बाहेर थोडाच पडतो ? भोलेनाथ!

शिशुपाल:—जाऊं दे तें. आतां कंबक्ति आली तिला इलाज काय बोल ?

पशुपाल:—तिला इलाज दारू.

शिशुपाल—दारू ? वाः खूप इलाज शोधून काढलास. महाराजांना जाऊं दिलें म्हणून खरपूस शिव्या आणि वर दारू प्याल्याबद्दल पलाखती मार. म्हणजे तुझ्या इलाजानें बक्षिसाची पुरी दामदुप्पटच होणार!

पशुपाल:—अरे दुप्पट काय आणि चौपट काय ? दारूच्या निशेंत कळेल तर ना त्याची फिकीर ? अरे आप मर गए, दुनिया डूब गई. भोलेनाथ! चल. असा नामर्दासारखा घाबरूं नकोस. अरे, हा तर आपला रोजचा खुराक. त्याला भिऊन कोठें चालते आहे ? रोज मरे त्याला कोण रडे ? उचल पाय. आंत जाऊन एकदम सुरईच्या सुरई रिचवून टाकूं. बस्. एकदां कैफ चढला कीं मग राणी येवो–नाहीं तर तिचा बाप येवो–आपण त्याला कांहीं दाद देत नाहीं. अरे भाई, रणांगणावर जसा कुसुंबा तशी गृहांगणांत ही दारू आहे.

हिची मस्ती अंगांत शिरली कीं एक वीर दसलाखांचा पीर बनतों. तेव्हां चल. "क्लैब्यं मा स्म गमः पार्थ" "युद्धयस्व विगतज्वरः" उचल पाय. हिंमत मर्दा तो मदत खुदा. भोलेनाथ! ( त्याला ढकलीत आंत नेतो ).

---

## प्रवेश दुसरा.

राजवाड्याच्या बागेंतील प्रतापादित्याच्या समाधीचें स्थल.

( तेजस्विनी समाधीस प्रदक्षिणा घालून नमस्कार करते व नंतर हात जोडून प्रार्थना करते ).

**तेजस्विनी**:—हे समाधिस्थ स्वातंत्र्यसूर्या!—

**१२ पद**—तिलक-कामोद—एकताल "परमपुरुषनारायण०-"

**वितरि प्रखर तेजोबल । करि जन समरनिरत ।**
**हरुनि दयाल मोहजाल ॥धृ०॥ करुनि दया । ने**
**विलया ॥ हा स्वदेश-नाश-काल ॥ १ ॥**

( पुनः प्रदक्षिणा करून व नमस्कार करून जाऊं लागते. इतक्यांत दुसऱ्या बाजूनें कंदर्प प्रवेश करतो ).

**कंदर्पः**—तेजस्विना—

**तेज०**:—कोण?

**कंदर्पः**—मी—कंदर्प...तुझा दास—

**तेज०**:—काय म्हणतां?

**कंदर्पः**—राजवाडा सोडून जाण्याचा तुझा निश्चय कायम झाला?

**तेज०**:—कायम झाला एवढेंच नव्हे तर राजवाड्याबाहेर पडण्यासाठींच मी निघाल्यें आहे.

**कंदर्पः**—पण तूं आतां जाणार कोणीकडे?

**तेज०**:—स्वातंत्र्याच्या रणांगणाकडे.

**कंदर्पः**—स्वातंत्र्याच्या रणांगणाकडे!

**तेज०:**—होय. स्वातंत्र्याचें रणांगण हेंच यापुढें माझें वसतिस्थान मी करणार; आणि जगावयाचें असलें तर तेथेंच जगणार व मरावयाचें असलें तरी तेथेंच मरणार.—

**१३ पद**—देसकार—त्रिताला. “ झनझन झनझन बाजे–”

**तनमनधनसुख सार । पायिं अरपुनि । पूजिन वरदा**
**सकल वीर–कुल–विजय देपता ॥ ध्रु०॥ पेटवुनि रण-**
**ज्वलन–ज्वाला ॥ आचरीन तप घोरतर महा ॥ १ ॥**

**कंदर्पः**—तेजस्विनी, तूं हा शुद्ध अविचार करीत आहेस. तूं एकटी स्वातंत्र्याच्या रणांगणावर अष्टौप्रहर आसन मांडून बसलीस म्हणजे स्वातंत्र्य-देवता कदंबावर सुप्रसन्न होईल अशी का तुझी कल्पना आहे ?

**तेज०:**—होय, अशी माझी कल्पनाच नव्हे, तर असा माझा दृढ विश्वास आहे. सहस्रावधि करांनीं सागरास मिठी मारणाऱ्या भागीरथीप्रमाणें स्वातंत्र्यगंगेचा उगमही टीचभर लांबीरुंदीच्या क्षेत्रांतच होत असतो. आज स्वातंत्र्याच्या रणांगणावर मी एकटीच वावरतांना दृष्टीस पडल्यें तरी उद्यांच्या सूर्यानें धरणिमातेचें पहिलें दर्शन करण्यापूर्वीं मी तें रणांगण सहस्रावधि स्वातंत्र्यवीरांनीं गजबजून सोडीन; आणि त्यांच्या प्रचंड आत्मयज्ञानें स्वातंत्र्य-देवतेला कदंबावर सुप्रसन्न होऊन वरप्रदान करण्यास हमखास भाग पाडीन.

**कंदर्पः**—पण तुझ्या या कृत्यानें कदंब राष्ट्रांत यादवीचा वणवा पेटून त्याचा सर्वस्वनाश होईल याची तुला कांहीं शुद्ध आहे का ?

**तेज०:**—गुलामगिरीच्या रौरवांत वर्षानुवर्षे सडत–कुजत-मरत पडण्या-पेक्षां स्वातंत्र्याप्रीत्यर्थ पेटविलेल्या यादवीच्या होमकुंडांत कदंब राष्ट्र एकदम जळून खाक झालें तरी त्यांत त्याचें परमकल्याणच आहे.

**कंदर्पः**—तेजास्विनी, मातंगेश्वराच्या मनांत कदंबाच्या स्वातंत्र्याचा अभिलाष बिलकुल नाहीं. तो आपलें राज्य आपणांस परत देणार आहे.

**तेज०:**—शक्य नाहीं. आपण होऊन घर चालून आलेली कादंब राजलक्ष्मी घराबाहेर घालवून लावण्याइतका मातंगेश्वर खुळा नाहीं. महाराज, राज्यें परत देण्यासाठीं जिंकलीं जात नसतात. चावून-गिळून-पचवून टाक-

ण्यासाठीं जिंकलीं जात असतात. मातंगेश्वर बिलंदर भामटा आहे. प्रारंभीं तो कितीही गोड बोलला तरी शेवटीं तो आपणांस तोंडघशी पाडल्या-वांचून खास राहणार नाहीं.

**कंदर्पः**—छे. शक्य नाहीं. मातंगेश्वर माझी अशी फसगत कालत्रयी करणार नाहीं. तो माझा राजमुगुट फिरून माझ्या मस्तकावर निःसंशय स्थापन करील.

**तेज०:**—पण त्यांत अर्थ काय ? स्वपराक्रमानें संपादन केलेलें राज्य-वैभव भ्याडपणानें परक्यांच्या पायावर प्रथम अर्पण करून मग त्याचा कृपाप्रसाद म्हणून तें फिरून उपभोगण्याची हांव धरणें म्हणजे शुद्ध मुर्दाड-पणाचें लक्षण आहे. या समाधीच्या गर्भांत शयन करणाऱ्या आपल्या पराक्रमशाली पित्यानें कदंबाचा राजमुगुट लोकांच्यापुढें भिकेची झोळी पसरून कमावलेला नाहीं; स्वतःच्या बाहुबलानें संपादन केलेला आहे. तेव्हां आपणही तो स्वपराक्रमाच्या हक्कानेंच शिरावर धारण केला पाहिजे; पर-क्यांच्या दयेचें लांछन म्हणून धारण करतां कामा नये. त्यापेक्षां आपलें हें मानी मस्तक राजमुगुटावांचून विशोभित राहिलें तरी बेहेत्तर आहे.

**कंदर्पः**—छे–छे–छे. तेजस्विनी, स्वातंत्र्याच्या वेडानें पिसाळलेली तूं एक शुद्ध पागल बायको आहेस !

**तेज०:**—होय खरोखरच मी स्वातंत्र्याच्या वेडानें भ्रमिष्ट झालेली एक पागल बायको आहे. पण दुनियेंत पागल कोण नाहीं ? हें जग म्हणजे एक जंगी पागलखानाच आहे.—

१४ पद–गझल. “ क़ियामत सरपे आई है०—”

**जगीं हा खाज वेडयांचा । पसारा माजला सारा ॥**
**गमे या भ्रान्त संसारीं । ध्रुवाचा ‘वेड’ हा तारा ॥ धृ० ॥**
**कुणाला वेड कनकाचें । कुणाला कामिनी जाचे ॥**
**भ्रमानें राजसत्तेच्या । कुणाचें चित्त तें नाचे ॥ १ ॥**
**कुणाला देव बहकावी । कुणाला देश चळ लावी ॥**
**कुणाची नजर धर्माच्या । निशेनें धुंदली भारी ॥ २ ॥**

अशा या विविध रंगांच्या । पिश्यांच्या लहरबहरींनीं ॥
दुरंगी दीन दुनियेची । जवानी रंगली सारी ॥ ३ ॥

मग असल्या वेड्यांच्या बाजारांत मी एकटीच तेवढी शहाणी कोठून असणार ? आणि खरें विचाराल तर मला शहाणे रहाण्यांत आनंदही वाटत नाहीं. ज्याला आपला प्रिय विषय हस्तगत करून घ्यावयाचा असेल त्यानें त्याकरितां वेडेंच बनलें पाहिजे. त्यांतूनही स्वातंत्र्यासारखा श्रेष्ठ पुरुषार्थ तर असल्या वेडावांचून सिद्ध होणें केवळ अशक्यच आहे. जगांतील सर्व महत्कार्यांचा उदय वेडाच्या उदरींच झालेला आहे. वेड हेंच महत्कार्यसिद्धीचें रहस्य आहे–परमयशाची गुरुकिल्ली आहे.

**कंदर्प**:–तेजस्विनी, तुझ्या वेडाला उन्मादाचें अगदीं भरतें आलेलें आहे.

**तेज०**:—होय. माझ्या वेडाला आज भरतेंच आलेलें आहे. आजचा काळच तसा आहे. आणि त्यांत या स्थलाचीही भर पडलेली आहे. हे आपल्या निस्सीम स्वातंत्र्यभक्त पित्याचें समाधिस्थान–म्हणजे स्वतंत्रतादेवीचें साक्षात् क्रीडांगण आहे–क्षात्रवृत्तीचें प्रत्यक्ष उगमस्थान आहे. येथील पशुपक्षीच काय, पण जड मूढ पाषाणसुद्धां स्वातंत्र्याच्या वेडानें पिसाळून जाऊन आपल्या मूक वाणीनें स्वातंत्र्याचीं दिव्य कवनें गातात-व आपल्या मुग्ध अचलतेनें वीरवृत्तीच्या स्वैरलीला करितात. मग माझ्यासारख्या जिवंत मनुष्य प्राण्याच्या अंगांत या ठिकाणीं अशा निकराच्या प्रसंगीं स्वतंत्रतादेवीचा संचार झाल्यास त्यांत आश्चर्य काय ? या पवित्र स्थानाचा महिमाच तसा अगाध आहे. खरें पाहिलें असतां आपल्यालासुद्धां येथें स्वातंत्र्याचें दिव्य स्फुरण चढलें पाहिजे व आपलें अंतःकरण देखील वीररसाच्या उन्मादानें बेहोषपणें नाचूं लागलें पाहिजे. परंतु दुर्दैव या देशाचें कीं असल्या लोकोत्तर स्वातंत्र्यवीराच्या पोटीं जन्म घेऊन आपणांस या ठिकाणीं पारतंत्र्याचे पोवाडे गाण्यास व भीरुपणास शहाणपणाच्या नांवानें आळविण्यास शरम वाटेनाशी झाली आहे. खरोखर, आपण या पवित्र भूमीवर पाऊल टाकून तिचा उपमर्द केला आहे-तिची विटंबना केली आहे. धिःकार–धिःकार असो आपणाला आणि आपल्या पौरुषाला !

**कंदर्प**:—आपलें प्रामाणिक मत बोलून दाखविल्यानें जर या स्थानाची

विटंबना होत असेल तर हें स्थान स्वतंत्रतादेवीचें क्रीडांगण होण्यास अपात्र आहे असेंच मोठ्या खेदानें म्हणणें भाग आहे.

**तेज०:**—अप्रामाणिक माणसांना प्रामाणिक मतें असतात असें म्हणणें म्हणजे जगाच्या डोळयांत धूळ फेंकणें आहे. प्रामाणिक मतांचा उदय नेहेमीं प्रामाणिक अंतःकरणांत होत असतो.—अप्रामाणिक अंतःकरणांत होत नाहीं.

**कंदर्पः**—म्हणजे? माझें अंतःकरण प्रामाणिक नाहीं अशी तुझी समजूत आहे?

**तेज०:**—समजूतच काय पण अशी माझी बालंबाल खात्री होऊन चुकली आहे. प्रामाणिक अंतःकरणें विरक्त आणि निर्भय असतात–विलासी आणि भ्याड असत नाहींत; आणि त्यांना स्वातंत्र्य प्रिय असतें–पारतंत्र्याचा विटाळही त्यांस खपत नाहीं. सुखोपभोगांच्या तामसी लालसेनें पारतंत्र्याच्या रौरवांत उडी घेण्यास सिद्ध व्हावयाचें आणि बेशरमपणानें प्रामाणिक अंतःकरणाचा व प्रामाणिक मतांचा डौल मिरवावयाचा म्हणजे ही शुद्ध सोदेगिरी आहे. आपल्यासारख्या विलासी भेकडाला मुळीं मतच असणें शक्य नाहीं. मग प्रामाणिक मतांच्या बाता कशाला?

**कंदर्पः**—म्हणजे तुझ्या मतानें मी अगदीं नादानांतला नादन ठरलों एकूण!

**तेज०:**—बेशक ठरलांत. महाराज प्रतापादित्यासारख्या अद्वितीय स्वातंत्र्यभक्ताच्या उदरीं आपल्यासारखा कुलांगार कसा पैदा झाला हेंच मला समजत नाहीं. आपण आपल्या रक्ताचें सिंचन करून वाढीस लावलेला स्वातंत्र्याचा दिव्य कल्पवृक्ष आपल्याच पोटीं जन्म घेणारा कुलकलंक दिवटा समूळ छेदून पाडणार आहे असें जर आपल्या जन्मकाळीं महाराजांना कळलें असतें तर आपल्या बालमुखांतून पहिला रोदनस्वर निघण्यापूर्वीच त्यांनीं आपल्या नरडीला नख देऊन आपल्या स्वतःच्या हातानें आपला कुलक्षय करून घेतला असता व आपल्या प्रिय मातृभूमीवर ओढवणारी ही दुर्धर भावी आपत्ति निःसंशय तेव्हांच टाळली असती. कंदर्प महाराज, व्यर्थ-व्यर्थ-तुम्ही आपल्या दिव्य मातापितरांच्या कुशींत जन्मास आलांत व आपल्याबरोबर आपल्या पूर्वींच्या आणि पुढच्या बेचाळीस पिढ्यांना नरकाचा रस्ता खुला करून दिलांत. यापेक्षां भिकारड्या आईबापांच्या पोटीं जन्म घेऊन

कोठें तरी उकिरड्यावर कुत्र्यामांजराप्रमाणें लोळत पडला असता तर आज या कादंब राजकुलाचे–राजसिंहासनाचे–राजमुगुटाचे असे धिंडवडे तरी जगांत झाले नसते. महाराज प्रतापादित्यांचा पुत्र आपल्या सिंहासनावर आपल्या कट्टया दुस्मानाला बसवून एखाद्या गुलामाप्रमाणें त्याच्या पायावर लोटांगण–छे–नाहीं–नाहीं–मला ती कल्पनासुद्धां करवत नाहीं.—

**कंदर्प:**—बस्, तेजस्विनी बस् कर. यापुढें तुझे हे कठोर वाग्बाण मला सहन होत नाहींत.—खरोखरच मी नामर्द–नादान–नालायक आहे. काढ-आपल्या कमरेची तलवार काढ आणि प्रतापादित्यांनीं जें केलें नाहीं तें करून मला आणि आपल्या राष्ट्राला या गुलामगिरीच्या लांछनापासून मुक्त कर. घे–तुझ्या तलवारीनें तुटून पडण्यासाठीं माझें पातकी मस्तक मी तुझ्या पुढें करीत आहे तें एका घावासरशीं धडापासून वेगळें कर आणि मग खुशाल आपला मार्ग धर. ( तिच्यापुढें गुडघे टेकून बसतो ).

**तेज०:**—कदंबाच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ तलवारीनें तुटून पडण्यासाठीं आपलें मस्तक माझ्यापुढें करण्याऐवजीं पारतंत्र्यापासून संरक्षण करण्यासाठीं तलवार धारण करण्यास आपण आपला हात माझ्यापुढें कां करीत नाहीं ?

**कंदर्प:**—कदंबाच्या स्वातंत्र्यरक्षणासाठीं तलवार धरण्यास मला हातच राहिलेला नाहीं. मातंगेश्वराच्या तहनाम्यावर सही करून मी तो आधींच कलम करून घेतलेला आहे.

**तेज०:**—कादंब राजसिंहासनावर पहिलें पाऊल ठेवतांना केलेल्या प्रजा-पालनाच्या प्रतिज्ञा ज्यांना बिनदिक्कत मोडता आल्या त्यांना मातंगेश्वराशीं केलेला तहनामा धुडकावून देण्यास एवढा संकोच कां वाटावा ?

**कंदर्प:**—संकोच वाटत नाहीं.—भीति वाटते. तहनामा धुडकावून मातंगेश्वराशीं लढण्यास उभे राहण्याची मला हिंमत होत नाहीं.

**तेज०:**—तर मग चला—उठा. तुमच्यासारख्या बेहिंमती–नादान पुरुषाच्या रक्तानें आपली तलवार विटाळण्याची मलाही इच्छा नाहीं. चला-जा. यापुढें एक अक्षरही आपणांशीं बोलण्याला मी तयार नाहीं. इतकेंच नव्हे तर महाराज प्रतापादित्यांच्या समाधीशेजारीं उभा राहून जो निर्लज्जपणानें गुलामांच्या गुलामालाही न शोभणारी नामर्दपणाची भाषा बोलतो त्या षंढाचें अत:पर मुखावलोकनही करावेंसें मला वाटत नाहीं. (झटक्यानें जाऊं लागते).

**कंदर्पः**—( तिचा हात धरून ) तेजस्विनी-तेजस्विनी-आपल्या प्रेमाचा असा शेवट व्हावाना ?

**तेज०:**—( हात सोडवीत ) चला-सोडा माझा हात. आपल्यासारख्या क्लीबाच्या हातांत देण्यासाठीं देवानें हा तेजस्विनीचा हात निर्माण केलेला नाहीं. या तेजस्विनीचें पाणिग्रहण करण्याचा अधिकार स्वातंत्र्याप्रीत्यर्थ शस्त्र ग्रहण करणाऱ्या समरधीर वीरालाच फक्त आहे; इतरांना नाहीं.(हात सोडवून निघून जाऊं लागते; इतक्यांत हालाहल शिपायांसह प्रवेश करतो ).

**हाला०:**—तेजस्विनी, थांब.एक पाऊल पुढें टाकूं नकोस.तूं कैदी आहेस.

**तेज०:**—कैदी! कोणाची कैदी ?

**हाला०:**—आमची कैदी.

**तेज०:**—तुमची कैदी ! छे-तुमच्यासारख्या भुरट्यांची कैदी ही तेजस्विनी कधींच होऊं शकणार नाहीं. चला, माझ्या वाटेंतून दूर सरा. नाहींतर तलवारीनें मला माझा रस्ता मोकळा करून घ्यावा लागेल (तलवार उपसते).

**हाला०:**—तुझ्याजवळ तलवार आहे आणि आम्ही तलवारी घरीं ठेवून आलों आहोंत वाटतें ? शिपायांनो, पकडा हिला आणि ही तलवार चालवील तर लष्करी शिस्तीप्रमाणें तुम्हीही आपल्या तलवारी चालविण्यास मागेंपुढें पाहूं नका. ( शिपायी तेजस्विनीस गराडा घालून तलवारी उपसूं लागतात ).

**कंदर्पः**—( एकदम पुढें होऊन ) थांबा-तलवारी उपसण्याचें कारण नाहीं. हालाहल, तेजस्विनीला पकडण्याचा तुम्हाला कोणीं हुकूम दिला ?

**हाला०:**—सौदामिनी राणीसाहेबांनीं-सरकार.

**कंदर्पः**—सौदामिनी राणी कधीं झाली ? आणि असले हुकूम सोडण्याचा अधिकार तिला कोणीं दिला ?

**हाला०:**—तें कांहीं आपल्याला ठाऊक नाहीं. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. मला हुकूम मिळाला-मी त्याची फौरन तामिली करण्यास दौडत आलों.

**कंदर्पः**—लष्करी शिस्तीच्या माणसानें वाटेल त्याचे हुकूम पाळावयाचे असतात वाटतें ? चला-तलवारी म्यान करा आणि तेजस्विनीला आपल्या वाटेनें जाऊं द्या.

**हाला०**:—जशी सरकारांची आज्ञा. (शिपायांस) शिपायांनो, तलवारी म्यान करा आणि तेजस्विनीचा मार्ग मोकळा सोडा. (शिपायी तसें करतात).

**कंदर्पः**—तेजस्विनी, तलवार म्यान कर आणि आपल्या वाटेनें निघून जा. तुझें कंदर्पावरचें प्रेम उडालें असलें तरीं कंदर्प तुझ्या प्रेमाच्या जाळ्यांतून अजून पुरा बाहेर पडलेला नाहीं. तेव्हां निदान तूर्त तरी आपल्या डोळ्यां-देखत तो तुझा या लोकांकडून असा अपमान होऊं देऊं इच्छित नाहीं.जा-आपल्या वाटेनें तुझी इच्छा असेल तिकडे निर्भयपणें निघून जा.

**तेज०**:—नाहीं. मी अशा तऱ्हेनें येथून जाऊं इच्छित नाहीं. तलवारीनें आपली मुक्तता करून घेण्याचें सामर्थ्य माझ्या मनगटांत असतां आपल्या कृपेनें झालेली सुटका मीं मान्य करावी हें मला योग्य वाटत नाहीं. मी आपली शत्रु आहें आणि येथून मुक्त होतांच आपल्याविरुद्ध बंडाचें निशाण उभारण्याचा माझा निश्चय झालेला आहे. तेव्हां मागच्या पुढच्या गोष्टींचा नीट विचार करून मग काय करावयाचें असेल तें करा.

**कंदर्पः**—सर्व गोष्टींचा विचार करूनच मी या वेळीं वागत आहें. तुझ्या-वरचें प्रेम झुगारून देऊन ज्या दिवशीं तुझें शत्रुत्व करण्याची माझ्यावर पाळी येईल त्या दिवशीं तुझें शत्रुत्व करण्यास मी माघार घेईन असें तूं समजूं नकोस. पण आज माझ्या या स्वातंत्र्यभक्त पित्याच्या समाधीशेजारीं मी परक्यांचा गुलाम बनलों असलों तरी तुझ्यासारख्या स्वातंत्र्यनिष्ठ स्त्रीला माझ्या पंक्तीला बसवावयाला माझें मन मला सांगत नाहीं. जा-(हालाहलास) हालाहल, तुम्ही आपल्या लोकांनिशीं राजवाड्यांत परत जा.

**हालाहलः**—जशी सरकारांची आज्ञा. (शिपायास) शिपायांनो, लष्करी शिस्तीप्रमाणें राजवाड्यांत परत चला. ( शिपायांसह निघून जातो ).

**तेज०**:—या समाधीच्या क्षणैक सान्निध्याचा आपल्या मनावर एवढा परिणाम झाला असेल तर अनुभवानें यापुढें आपण आपल्या या समाधिस्थ पित्याच्या चारित्र्याचेंच अनुकरण कराल असा मला दृढविश्वास वाटतो.

**कंदर्पः**—अनुभवानें माझ्या सर्व कल्पना खोट्या ठरल्या तर प्रेमा-प्रमाणें तत्त्वानेंही मी तुझाच होईन ही खात्री ठेव.

**तेज०**:—तर मग महाराजांनीं या समाधीच्या नित्य दर्शनानें स्वतंत्रता-

देवीची एकनिष्ठपणें आराधना करावी. म्हणजे स्वातंत्र्यदेवता हा सुप्रसंग लवकरच घडवून आणल्यावांचून रहाणार नाहीं. महाराज—

१५ पद–केदार गौडा–एकतांला " वंदितं पदाम्बुजम् "

**देवता स्वतंत्रता ॥ मधु–मधुरालापिनी । सकल**
**विश्वमोहिनी ॥ ध्रु०॥ वितरि दिव्यानंद ॥ गौरवुनी ।**
**अति सुरसा । वीर–रसा ॥ १ ॥** ( निघून जाते )

**कंदर्पः** —(स्वगत) झालें–आतां माझें जीवित निःसार झालें ! येथून पुढें माझ्या नशिबीं दुःखावांचून कांहींच उरलें नाहीं ! परमेश्वरा, माझ्या आशेचा असा शेवट व्हावा ना ? पण तूं तरी काय करणार ? मीं स्वतःच्या हातानेंच आपला सर्वस्वनाश करून घेतला. हिंमत धरून मी जर स्वातंत्र्ययुद्धास सिद्ध झालों असतों तर तेजस्विनीनें माझा असा धिक्कार कां केला असता ?–पण–पण मला अजूनही युद्धास सिद्ध होतां येणार नाहीं का ? कां--कां-कां होतां येणार नाहीं ? माझ्या अंतःकरणांतील स्वातंत्र्यप्रेम अजून जळून खाक झालेलें नाहीं आणि माझ्या विक्रमशाली पित्याचें माझ्या अंगांत खेळणारें रक्तही अजून गोठून आटून गेलेलें नाहीं. मग माझ्या देशाच्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्यासाठीं रणांगण जागविण्याला मला हरकत काय ?--छे -हरकत तर कांहींच दिसत नाहीं. मग विलंब कां ?--तेजस्विनीच्या पाठोपाठ स्वातंत्र्याच्या रणांगणाकडे मी एकदम धाव कां घेऊं नये !--मना--चल, हिंमत धर–आणि तेजस्विनीच्या मागून जाण्यास तयार हो. ( जाऊं लागतो--पण पुनः थांबून)–पण तेजस्विनीच्या मागून मी गेलों तर सौदामिनी काय म्हणेल ?--छे -या सौदामिनीनें तर माझा अगदीं सारखा पिच्छा पुरविला आहे. पण तें कांहीं नाहीं. तेजस्विनीच्या प्रेमास पात्र व्हावयाचें असेल तर सौदामिनीचा त्याग मला केलाच पाहिजे.--पण तिचा त्याग मी करणार तरी कसा ? तिनें तर माझें जीवित अंतर्बाह्य व्यापून टाकिलें आहे.- पण छे--मनाचा निर्धारच केला तर त्यांत कांहींच कठिण नाहीं. ( विचार करून ) होय--निर्धार केलाच पाहिजे. या समाधिस्थ थोर स्वातंत्र्यवीराच्या पोटीं जन्मास येऊन हें रणभीरुपणाचें लांछन मी आपल्याला कसें लावून घ्यावें ? ( पुनः विचार करून ) बस्. झाला निश्चय कायम. या माझ्या समाधिस्थ

पित्याच्या साक्षीनें मी युद्धाची प्रतिज्ञा करतों. आणि आतांच्या आतां परत राजवाड्यांत जाऊन व सौदामिनीचा संबंध तोडून मातंगेश्वराचा तहनामा धुडकावून देतों.--( समाधिपुढें नम्र होऊन ) हे स्वातंत्र्यवीरा--तुझा अदृश्य वरदहस्त माझ्या मस्तकावर ठेव आणि माझा निश्चय पार पाडण्याचें मला सामर्थ्य दे. ( उठून) बस्–आतां–

१६ पद्—शंकरा-त्रिताल. "कपटमया माया.०—"

**प्रलय–महाकाला ॥ भेरिनादें । जागवोनी । चेतवीतो ॥**
**घोर संगरानला संहारा ॥ ध्रु० ॥ मदोन्मत्त खल–दल**
**बलिदाना । करोनि वीर–कुला । मिळविन यश; वा**
**सेवुनि मरणा । साधिन सद्गति शुभंकरा ॥ १ ॥**

—त्वेषानें निघून जातो.

---

## प्रवेश ३ रा.

[ राजवाडा. सौदामिनी, शिशुपाल व पशुपाल प्रवेश करतात. ]

**सौदा०:**—( रागानें ) लबाड–पाजी–चोर कोठले ! जातांना मी तुम्हांला वारंवार बजावून ठेविलें होतें, तरी तुम्ही अखेरीस पाजीपणा करावयाचा तो केलातच.

**शिशुपालः**—सरकार, देवाशपथ मी ही बातमी सरकारांच्या कानावर घातली नाहीं.

**सौदाः०**—तूं घातली नसलीस तर या चोरानें घातली असेल.

**पशुपालः**—नाहीं सरकार. भोलेनाथ साक्ष–मी सुद्धां घातली नाहीं.

**सौदा०:**—मग कोणीं हा पाजीपणा केला ?

**शिशुपालः**—तेजस्वीनीच्या दासींनीं लवंडीच्यांनीं हा सारा घोंटाळा केला, सरकार.

**सौदा०:**—तेजस्वीनीच्या दासींनीं ? त्या सटव्या येथें आल्या कशा ? आणि तुम्हांला पहाऱ्यावर ठेविलें असतां आंत शिरल्या कशा ?

**पशुपालः**—आंत शिरण्याची त्यांची काय छाती होती ? एकाद्या जबरदस्त डाकूप्रमाणें या माझ्या तलवारीचें टोंक त्यांच्या छातीला भिडवून मीं त्यांना येथें दगडासारखें डांबून ठेविलें होतें. भोलेनाथ !

**सौदा०**:—मग त्यांनीं ही बातमी महाराजांच्या कानावर कशी घातली ?

**पशुपालः**—खुद्द महाराजच बाहेर आले त्याला काय करणार ? आम्ही दोघांनीं आपला हुकूम ततोतंत पाळला. पण महाराजांनींच आपल्या विरुद्ध बंड उभारलें त्याला आमचा उपाय काय ? भोलेनाथ !

**सौदा०**:—तें कांहीं नाहीं. तुम्ही दोघेही फितुरी बदमाश आहांत हेंच खरें.

**शिशुपालः**—सरकार मालक आहेत. तेव्हां आम्ही गरिबांनीं काय बोलावें?

**पशुपालः**—पण हें लांडग्याच्या अपराधाबद्दल कोंकरांना बडविणें आहे एवढें मात्र बोलल्यावांचून रहावत नाहीं. भोलेनाथ !

**सौदा०**:—(चवताळून) बस्. असली फाजील बडबड नको आहे मला. तुमच्यासारख्या लफंग्यांना यापुढें राजवाड्यांत राहूं देणेंसुद्धां धोक्याचें आहे. तेव्हां चला–आपलें बिऱ्हाडवाजलें उचलून आतांच्या आतां राजवाड्याच्या बाहेर व्हा.

**शिशुपालः**—सरकार, खरोखरच आम्ही गुन्हेगार नाहीं. वाटेल त्याची शपथ घेऊन सांगतों.

**पशुपालः**—वाटेल त्याची कशाला ? खुद्द सरकारांचीच शपथ घेऊन सांगतों. भोलेनाथ ! तेव्हां सरकारांनीं आमच्यावर दया करावी.

**सौदा०**:—काय लोंचट कुत्रे आहांत रे तुम्ही ? चला—या वेळीं माझें डोकें संतापानें तापून गेलें आहे. तेव्हां माझ्यासमोरून पहिल्यानें काळें करा. नाहींतर शिपायांकडून लाथा घालवून मी तुम्हांला बाहेर काढवीन. चला–

**शिशुपालः**—तर मग नाइलाज आहे आमचा.

**पशुपालः**—भाटीच पिलें खाऊं लागल्यावर कोणाकडे दाद मागावयाची ? (हळूंच) शिशुपाल, काढ पाय नाहीं तर गंडांतर आलेंच, भोलेनाथ!(जातात).

**सौदा०**:—( स्वगत ) आतां काय करावें ? महाराजांची गांठ पडण्यापूर्वी हालाहलानें तेजस्वीनीला कैद केली असली तर ठीक. नाहीं तर ही चंचल स्वभावाची स्वारी पुनः बिथरल्यावांचून राहावयाची नाहीं. (हाला० प्र. क.).

**हाला०:**— राणीसरकार—

**सौदा०:**—कोण ?

**हाला०:**—सेनापति हालाहल.—

**सौदा०:**—हालहाल, तेजस्विनीची व्यवस्था लागली ?

**हाला०:**—नाहीं सरकार.

**सौदा०:**—नाहीं ? म्हणजे ? कां लागली नाहीं ?

**हाला०:**—कशी लागणार ? सरकारांच्या हुकुमाप्रमाणें मी तिला कैद केलें. लष्करी शिस्तीप्रमाणें माझें तें कामच होतें. पण खुद्द महाराजांनीं मध्यें पडून तिला सोडून दिलें. तेव्हां मी काय करणार ? मी लष्करी शिस्तीचा माणूस. मला महाराजांचा हुकूम मानणें भाग पडलें.

**सौदा०:**—काय म्हणतां ? तुम्हीं तिला कैद केलें असतां महाराजांनीं मध्यें पडून तिला सोडून दिलें ?

**हाला०:**—यांत काय संशय ? मी लष्करी शिस्तीचा माणूस-खुद्द महाराज मध्यें पडले नसते, तर आपल्या हुकुमाविरुद्ध मी प्राण गेला तरी गेलों नसतों. शंका येत असल्यास माझ्या शिपायांना सरकारांनीं विचारून पहावें.

**सौदा०:**—" सौदामिनी राणीसाहेबांनीं तेजस्विनीला कैद करण्याचा मला हुकूम केला आहे " असें तुम्ही महाराजांना सांगितलें नाहीं ?

**हाला०:**—सांगितलें तर. अगदीं बरोबर आपण उच्चारलेल्या शब्दांतच मीं महाराजांना बजावलें. पण उपयोग काय ? आपलें नांव सांगतांच त्यांच्या पायाची आग मस्तकाला चढून त्यांनीं आपल्यावरच मोर्चा लावला आणि "सौदामिनी राणी नाहीं व तिला असले हुकूम सोडण्याचा अधिकार नाहीं." असें मला उलट ठांसून बजावून तेजस्विनीला सोडून दिलें. मग मी काय करणार ? मी लष्करी शिस्तीचा माणूस. मला—

**सौदा०:**—बस्. तुमचें लष्करी शिस्तीचें आख्यण कडवें नको आहे मला. माझा हुकुम मोडून तुम्ही तिला सोडून दिलेंत ना ? तर मग चला चालते व्हा माझ्या डोळ्यासमोरून. लष्करी शिस्त पाळण्याला तुम्ही अगदीं अगदीं नालायक आहांत. व्यर्थ व्यर्थ तुमच्यासारख्या लपोट शंखाला मी एवढ्या हुद्द्यावर चढविलें. मोराचीं पिसें चिटकविल्यानें कावळा कांहीं केकावत नाहीं हेंच खरें.—चला निघा येथून. चालते व्हा.—

**हाला०:**—महाराजांनाही न जुमानण्याचा सरकारांनीं हुकूम केला असता तर—

**सौदा०:**—बस्. जास्त वटवट लावूं नका. तुमच्या आगळिकीनें माझें मस्तक अगदीं फिरून गेलें आहे. चला चालते व्हा माझ्यासमोरून. सारा चोरांचा बाजार माजला आहे!

**हाला०:**—ठीक आहे. जशी सरकारांची आज्ञा. मी लष्करी शिस्तीचा-(सौदामिनी डोळे वटारते). राहिलें. चाललों मी. (जातो.)

**सौदा०:**—(स्वगत) हालाहलानें सांगितलेली हकीकत ऐकल्यापासून माझ्या अंगाचा कसा भडका उडला आहे. मी राणी नाहीं काय? असले हुकूम सोडण्याचा मला अधिकार नाहीं काय? छे—छे—हा अपमान अगदीं असह्य आहे कंदर्पा—कंदर्पा—आणखी दोन दिवस गमजा करून घे. मातग युवराजाचा पाय राजधानीच्या वेशीला लागला कीं सौदामिनी कोण आहे व तिचा अधिकार काय आहे याचा प्रत्यय मी तुला ताबडतोब आणून देईन. खूप समजून ऐस.—

**१७ पद**. शंकरा-त्रिताल. "गुणिय नसो डरियो०-"

**नमविन मी पदीं या ॥ त्वरित तुज; । हा, पळ नलगे,**
**गर्व हराया ॥ ध्रु० ॥ मानधना मी राजबाला ॥ खर**
**अवमाना । साहिन का या? ॥ १ ॥**

(कंदर्प प्रवेश करतो).

**कंदर्पः**—(स्वगत) बस्. आतां एका झटक्यासरशी सौदामिनीच्या प्रेमाची बेडी तोडून टाकून लढाईची नौबत ठोकण्याचा हुकूम सोडतों. (पाहून) पण ही पहा सौदामिनी येथेंच उभी आहे. तेव्हां आतां जिवाचा धडा करून येथल्या येथेंच निकाल करून टाकूं. उगाच विलंब लावण्यांत अर्थ नाहीं.-पण इच्याशीं भाषणाला सुरुवात कशी करावी?(विचार करतो).

**सौदा०:**—(पाहून) कोण उभें आहे तें?

**कंदर्पः**—(स्वगत) मना, हो तयार. शब्दांनो, तोंडांत अडखळूं नका.

**सौदा०:**—(पुनः) कोण उभें आहे तें?

**कंदर्पः**—मी—कंदर्प—कदंबाचा राजा—

**सौदा०:**—अस्सें ? आपण ? कंदर्प ! कदंबाचे राजे ! ठीक आहे. पण कदंबाच्या राजांची स्वारी एकटीच कोणीकडे फेरफटक्याला गेली होती ?

**कंदर्पः**—तेजस्विनी राजवाडा सोडून गेली तिची भेट घेण्याला गेलों होतों.

**सौदा०:**—तिनें भेटीचें निमंत्रण पाठविलें होतें वाटतें ?

**कंदर्पः**—निमंत्रणाची जरूर काय? भेट घ्यावीसें वाटलें-भेट घेऊन आलों.

**सौदा०:**—अस्सें ! सकाळीं दरबारांत तिनें एवढी शोभा केली त्याचें मनाला कांहींच वाटलें नाहीं आं !

**कंदर्पः**—काय वाटावयाचें ? शोभेची लाजलज्जा स्वतंत्र बाण्याच्या स्वाभिमानी पुरुषाला. स्वाभिमानशून्य गुलामाला काय त्याचें ? गुलामाला मान आणि अपमान दोन्ही सारखेच !

**सौदा०:**—गुलामाला मान आणि अपमान सारखे असतील. पण आपण कांहीं गुलाम नाहीं.

**कंदर्पः**—नांवानें गुलाम नसेन कदाचित्. पण स्थितीनें गुलामगिरीचाच अनुभव मला पदोपदीं येत आहे.

**सौदा०:**—पण पदोपदीं प्रत्ययास येणारी गुलामगिरी आपण मुकाट्यानें सहन कां करता ?

**कंदर्पः**—यापुढें ती सहन करावयाची नाहीं—एवढेंच नव्हे तर या क्षणीं तिचा पाश तोडून टाकावयाचा असाच मीं निश्चय केला आहे.

**सौदा०:**—खरें ?

**कंदर्पः**—खरें म्हणजे ? खरेंच खरें–अगदीं लाख वेळां खरें ! इतकेंच नव्हे तर हा निश्चय ताबडतोब अमलांत आणण्याकरितां, सौदामिनी, मातंगेश्वराशीं केलेला तह झुगारून देऊन आतांच्या आतां युद्धाचा पुकारा करण्याचेंही मीं ठरविलें आहे.

**सौदा०:**—( स्वगत ) स्वारी फारच जोरांत आलेली दिसते. तेव्हां साध्या मात्रेनें काम भागणार नाहीं. चांगलें अवसान अंगांत आणलें पाहिजे. ( उघड ) बरें, पुढें ?

**कंदर्प**:—पुढें काय ? तुला माझें करणें पसंत आहे कीं नाहीं सांग. पसंत असेल तर आपला स्नेह कायम आहे म्हणून समज. नाहीं तर हीच आपली उभयतांची अखेरची मुलाखत.

**सौदा०**:—असें ? तर मग ही कट्यार घ्या आणि या माझ्या छातींत खुपसून या आपल्या अखेरच्या मुलाखतीची अखेर करून टाका.

( कट्यार पुढें धरते ).

**कंदर्प**:—मोठी विलक्षण बायको दिसतेस तूं !

**सौदा०**:—दिसत्ये कां ? मी विलक्षण आहेच. पण मी विलक्षण असल्यें अगर सुलक्षण असल्यं तरी आपल्याला काय करावयाचें ? आपल्याला माझ्यापासून त्रास होत आहे. तेव्हां या वीतभर पात्याच्या मदतीनें त्यांतून आपण आपली कायमची सुटका करून घ्या आणि आपल्या मार्गाला लागा. कां ? आपण असें मागें कां सरलांत ? आपल्याला हिंमत होत नसेल तर मीच आपला मार्ग मोकळा करून देत्यें. देवा, घे या अनाथ अबलेला पदरात— ( कट्यार उरांत भोंसकून घेण्याचा आविर्भाव दाखवित्ये ).

**कंदर्प**:—( तिचा हात धरून ) हां-हां सौदामिनी हें काय ?

**सौदा०**:—( हात सोडविण्याचा बहाणा करीत ) सोडा—सोडा माझा हात. महाराजांचें आतां माझ्यावर पूर्वीचें प्रेम राहिलेलें नाहीं.—महाराजांना माझा तिटकारा वाटूं लागला आहे आणि आपल्या मानगुटीची ही साडेसाती केव्हां सुटेल असें महाराजांना होऊन गेलें आहे. मग आतां मला जिवंत राहून करावयाचें काय ? सोडा—सोडा माझा हात.—मरूं द्या मला.—

**कंदर्प**:—हें तुझें कांहीं तरी तर्कट आहे. माझें तुझ्यावरील प्रेम रतिभरही कमी झालेलें नाहीं. अगर मला तुझा तिटकाराही वाटूं लागलेला नाहीं.

**सौदा०**—हा नुस्ता मानभावीपणा आहे. महाराजांचे माझ्यावर पूर्वीप्रमाणें प्रेम असतें तर माझ्या सहवासांत महाराजांना पदोपदीं गुलामगिरीचा अनुभव खास आला नसता व महाराजांनीं अखेरच्या मुलाखतीचें नांव माझ्यासमोर कव्हांही काढलें नसतें.—

**कंदर्प**:—माझी चूक झाली. क्षमा कर. आतां फिरून मी तुझ्यासमोर अखेरच्या मुलाखतीचें नांव प्राणांतीही काढणार नाहीं. सोड. ती कट्यार दे इकडे. ( कट्यार हिसकावून घेतो. )

**सौदा०:**- घ्या-खुशाल घ्या ती कट्यार ! जगांत कांहीं एवढीच एक कट्यार नाहीं -[ जाऊं लागते ].

**कंदर्पः**—[ तिला अडवून ] छे-दुसऱ्या कट्यारीनेंही मी तुला मरूं देणार नाहीं. तुला जगलेंच पाहिजे आणि तेंही माझ्या सहवासांतच जगलें पाहिजे

**सौदा०:**—छे.-मला जगावयाचें असलें तरी आपल्या सहवासांत तर यापुढें मी प्राण गेला तरी जगावयाची नाही. मी आपली खुशाल एखाद्या मठांत जाईन आणि तेथें जन्मभर जोगीण बनून राहीन चला-सोडा माझी वाट.-मला जाऊं द्या. राजवाड्यांत राजाची रखेली म्हणून रहाण्यापेक्षां मठांत देवाची सेवेकरीण होऊन राहणें शतपटीनें चांगलें.-[ जाऊं लागत्ये ].

**कंदर्पः**—( तिला धरून ) छे - तुला जसें मरतां यावयाचें नाहीं तसें जोगीणही बनतां यावयाचें नाहीं. तुला राणीच झालें पाहिजे आणि येथें राजवाड्यांत आमच्याजवळच राहिलें पाहिजे. चल--हा पहा मीं लढाईचा बेत रद्द केला—आणि तुझी सत्ता मान्य केली.—आतां तुझें म्हणणें काय ?

**सौदा०:**—आपण नेहमींच असं सोंग आणतां पण आतां कांहीं मी आपल्या लाघवी बोलण्याला फसावयाची नाहीं.तेजस्विनी आपला वाटेल तेव्हां वाटेल तेथें वाटेल त्याच्या समक्ष वाटेल तसा पाणउतारा करते म्हणून तिची आपली भेटच होऊं नये असा मीं बंदोबस्त केला. पण आपल्याला ती कैद वाटली आणि आपण माझी इच्छा मोडून माझ्यामागें मला न कळवितां तिची भेट घेतलीत. आपणांला जर तिच्या सुंदर मुखांतून निघालेल्या गोड गोड शिव्या खाण्याची एवढी हौसच होती तर मला तसें आपण सांगावयाचें होतें. म्हणजे आमदरबार भरवून मीं तिला तेथें मुद्दाम मोठ्या सन्मानानें बोलावून आणविलें असतें आणि सर्व दरबाऱ्यांसमक्ष तिच्याकडून आपल्या मस्तकावर शेलक्या शिव्यांची लाखोली वाहविली असती. माझें काय त्यांत बिघडत होतें ?

**कंदर्पः**—कबूल. ही माझी चूक झाली. आणि तिच्याबद्दल मी तुझी क्षमा मगाण्यास तयार आहें. झालें ?

**सौदा०:**—झालें काय ? ही एकच चूक असती तर ती मीं सुद्धां मनावर घेतली नसती. पण हिच्यापेक्षांही भयंकर चूक आपण करून ठेविली आहे

तिची वाट काय ? तेजस्विनीनें जर आतां देशांत दंगा उडविला तर तो निस्तरणार कोण ? प्रेमाच्या आवेशांत आपण तिला सोडून दिलेंत खरें; पण आतां ती देशाला आग लावीत सुटली म्हणजे तिला आवरावयाची कशी ? तहनाम्यांतील शर्तीप्रमाणें उद्यां कदंबांच्या निशाणाच्या जागीं मातंगांचा विजयध्वज उभारून मातंगेश्वराची सत्ता कदंबावर जाहिर करावयाची; परवां विजयी मातंग युवराजांची स्वारी राजधानींत प्रवेश करावयाची; आणि पुढें दोन दिवसानीं युवराजाना राज्याभिषेक करून त्यांचें माडलिकत्व मान्य करावयाचें. इतक्या गोष्टी अजून व्हावयाच्या. तेव्हां अशा वेळीं तेजस्विनी मोकळी असणें हें बरें आहे का ? बोला. आतां असल्या प्राणघातक चुकीची मी आपणाला क्षमा कशी करावयाची सांगा. आणि मीं क्षमा केली तरी तेजस्विनीच्या धिंगाण्यामुळें देशांत उद्भवणारें बंड कांहीं आपोआप जागच्याजागीं जिरून जात नाहीं. तें भडकणारच आणि आपल्या कार्याला विघ्न हें येणारच. ही परिस्थिति पाहिल्यावर मातंगेश्वर आपलें राज्य परत करण्याचें आश्वासन तरी पाळील कीं नाहीं कोणास ठाऊक ? तेव्हां असल्या उठाठेवींत पडून आपल्या हातानें आपल्या पायावर धोंडा पाडून घेण्यापेक्षां साऱ्या भानगडी सोडून स्वर्गांत नाहीं तर निदान मठांत तरी 'हरि हरि' म्हणत बसणें काय वाईट ? महाराज—

१८ पद–धानी–त्रिताल. "काननके बसिया०—"

**रामपदीं नमतां । रमतां ॥ सफल जनन जनिं;**
**भावचि जीवा । मार्ग खरा या । भवा तराया ॥ ध्रु० ॥**
**मोहुनि प्रेमा स्वार्थ न केला ॥ परमार्थहि तो हातुनि**
**गेला ॥ लाभ काय तरि ? जीवित वाया ॥ १ ॥**

**कंदर्पः**—खरेंच. ही सुद्धां माझी मोठीच चूक झाली. काय करावें ? मला या साऱ्या गोष्टींचें त्या वेळीं अगदीं भानच राहिलें नाहीं. पण आतां झालें तें होऊन गेलें. पुढें काय करावयाचें सांग.

**सौदा०:**—पुढें दुसरें काय करावयाचें ? हालाहलांना पाठवून तेजस्विनीला ताबडतोब कैद करावयाची.

**कंदर्पः**— एकदां सोडून दिल्यावर पुनः कैद करावयाची ?

**सौदा०**—बिघडलें काय त्यांत ? झालेली चूक दुरुस्त करूं नये असें कांही शास्त्र का आहे ?

**कंदर्पः**—शास्त्र नाहीं. पण तें जरा मनाला कसेसेंच वाटतें. दुसरी कांहीं तोड काढ.

**सौदा०**:—दुसरी तोड म्हणजे हद्दपार करावें.

**कंदर्पः**—हां, हें ठीक आहे. कैदेपेक्षां हद्दपारी बरी दिसते.

**सौदा०**:—तर मग हालाहलांना आतां बोलावून आणवितें.

**कंदर्पः**—आणीव.

**सौदा०**:—कोण आहे रे तिकडे ? ( शिशु. प्र. क. )

**शिशु०**:—सरकार, मी आहे. ( पशु० प्र. क. ).

**पशु०**:—आणि मीही आहें.

**सौदा०**:—मेल्यांनो, तुमच्या धिंडका अजून राजवाडा सोडून निघून गेल्याच नाहींत का ?

**शिशुः**—सरकारांचे चरण सोडून आम्ही दुसरीकडे कोठें जाणार सरकार ?

**पशु०**:—कुंभाराच्या गाढवांना कुंभारवाड्याशिवाय दुसरा कोठें आश्रय मिळणार सरकार ?

**सौदा०**:—खरेंच–तुमच्या सारख्या गाढव नसणाऱ्या गाढवांना लाथांचा सुकाळ करावयाला राजवाड्यावांचून दुसरें ठिकाण जगाच्या पाठीवर नाहीं खरें. पण तें राहूं द्या. आतांच्या आतां हालाहलाला बोलावून आणा.

**शिशु०**:—मी एकटाच जाऊं ?

**पशु०**:—कां आम्ही दोघेही जाऊं ?

**सौदा०**:—दोघेही जा.

**शिशु०**:—ठीक आहे.

**पशु०**:—जशी सरकारांची आज्ञा. भोलेनाथ ! ( दोघे जातात ).

**सौदा०**:—बरें. आपण मला मरूंही देत नाहीं आणि मठांतही जाऊं देत नाहीं. तेव्हां मी आपल्याला आतां अखेरचें विचारतें कीं आपण दोघांनीं जन्मभर एकत्र नांदावें अशी खरीच आपली इच्छा आहे का ?

**कंदर्पः**—होय. अगदीं मनापासून इच्छा आहे.

**सौदा०:**—पण आपल्याला एकत्र नांदायचें असेल तर आपल्याला सदैव माझ्या तंत्रानें चालावें लागेल. मी कांहीं आपल्या तंत्रानें चालणार नाहीं. कबूल आहे का आपल्याला हें ?

**कंदर्पः**—कबूल आहे. तुझ्या तंत्रांतून बाहेर पडण्याचा यत्न केला-- आणि फजित होण्याची वेळ आली. तेव्हां एकदां अद्दल घडल्यावर फिरून तोच मूर्खपणा करण्याला माझी तयारी नाहीं. सौदामिनी,—

१९ **पद**–" धनहंस किंकिणी० "

**रतिरंग–रंगिणी ॥ रसिक–मन–मोहिनी ॥ ध्रु० ॥**
**मृदुबोल मधु–मधुर ॥ शिरिं धरिन चिरकालिं ॥**
**गुरु देवता मजसि ॥ तूंचि वर–दायिनी ॥ १ ॥**

( तिच्या पायाशीं लीन होतो. इतक्यांत शिशु० येतो ).

**शिशु०:**—सरकार, सेनापतिसाहेब आले आहेत. ( पशु० प्र. क. ).

**पशु०:**—सरकार, सेनापतिसाहेब बाहेर आज्ञेची वाट पहात आहेत. भोलेनाथ !

**सौदा०:**—घेऊन या त्यांना आंत.

**शिशु०:**—जशी सरकारांची आज्ञा.

**पशु०:**—जसा सरकारांचा हुकूम, भोलेनाथ ! (दोघे जाऊन हालाहलास आणतात ).

**हाला०:**—सरकारांचीं काय आज्ञा आहे ?

**सौदा०:**—फौजेची एक तुकडी घेऊन आतांच्या आतां तेजस्विनीला पकडा आणि ताबडतोब सरहद्दीबाहेर हाकलून द्या.

**हाला०:**—सरकार, सौदामिनीबाईसाहेब सांगतात त्याप्रमाणें करण्यास सरकारांची आज्ञा आहे काय ? मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. तेव्हां सरकारांच्या हुकमावांचून राणी नसणाऱ्या बाईसाहेबांच्या शब्दाला मला मान देतां येणार नाहीं. हो–एकदां ठोकर बसली तेव्हां पुनः जपून पाऊल टाकलें पाहिजे.

**सौदा०:**—ऐकलेत हे शब्द ! मघां आपण या नंदीबैलाला पढविलांत त्याची ही उजळणी ! मला सर्व कांहीं याच्याकडून कळलें. पण करावयाचें

काय ? मी राणी नाहींच. तेव्हां मला सगळें निमूटपणें सोसणेंच भाग आहे. राणीसाहेब नाहीं तरी बाईसाहेब म्हणून म्हणाला हें तरी माझें भाग्यच. नाहींतर बायको नसणाऱ्या बायकोला ज्या नांवानें हाक मारतात तेंच नांव यानें घेतलें असतें म्हणजे माझी पुरी शोभाच झाली असती.

**हाला०:**—बाईसाहेब, असें भलतेंच कसें होईल ? आपण प्रत्यक्ष बायको नसलात तरी अप्रत्यक्ष बायको आहांत हें काय मी जाणत नाहीं ? पण काय करणार ? मी लष्करी शिस्तीचा माणूस. सरकारांनीं बजावल्यानंतर मी आपणाला राणीसाहेब कसें म्हणणार ?

**शिशु०:**—अगदीं बरोबर ?

**पशु०:**—अगदीं, भोलेनाथ ? मिया बोलल्यावांचून दाढी कशी हालणार ? भोलेनाथ !

**कंदर्पः**—हालाहल, सौदामिनी आजपासून कदंबाची राणी झाली आहे. आणि तिचा शब्द म्हणजे माझीच आज्ञा असें समजून तो बिनतक्रार पाळला गेला पाहिजे. यापुढें सौदामिनीच्या नांवापुढें " राणीसाहेब " हा किताब न लावतां जर तिच्या नांवाचा कोणीं एकेरी उच्चार केला व तिच्या मुखांतून निघालेला शब्द झेलण्यास इन्कार केला तर त्याचें डोकें एकदम फांसावर लटकाविलें जाईल. लक्षांत ठेवा.

**हाला०:**—जशी सरकारांची आज्ञा. ( सौदामिनीस ) सरकारी हुकमानें बायको नसणाऱ्या बायकोच्या पदावरून राणी पदावर चढलेल्या सौदामिनी राणीसाहेबांचा जयजयकार असो. ( मुजरा करतो ).

**शिशु०:**—मीही सौदामिनी राणीसाहेबांचा जयजयकार करतों

**पशु०:**—आणि मीहि पण शिशुपालाच्या जयजयकाराला भोलेनाथ करतो. भोलेनाथ ! ( दोघे मुजरा करतात ).

**हाला०:**—घेतो आतां मी रजा. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. तेव्हां हुकुमाच्या तामिलींत मला दिरंगाई करतां येत नाहीं. उभयतां सरकारांचा जयजयकार असो ! ( जातो ).

**शिशु०:**—राणीसरकारांची आणखी काय आज्ञा ?

**सौदा०:**—आपण येथून एकदम काळें करावें.

**पशु०**:–आणि मला राणीसरकारांचा काय हुकूम ?

**सौदा०**:—जो यांना तोच तुम्हांला.

**पशु०**:—ठीक आहे. शिशुपाल–चल हो पुढें. गाईमागून वासरूं, भोलेनाथ ! ( दोघे जयजयकार करून जातात.

**कंदर्प**:—झालें तुझ्या मनासारखें ? माझ्या प्रेमाची खात्री पटली ?

**सौदा०**:—पटली म्हणून विचारायला का पाहिजे ? ( आलिंगन देते.) महाराज—

२० **पद**–आनंद–झपताला. " आज आनंद भए०–"

**होत आनंदमय सुरलोक भुवन हें ॥ रसिका जीवा**
**लागे प्रेमछंद ॥ ध्रु० ॥ करि हा मना दंग ॥ श्रंगार–रस-**
**रंग ॥ गगनांतरंगीं सदा विहार ॥ १ ॥**

–जातात.

---

## प्रवेश चौथा.

( नगरांतील एक मार्ग. दवंडीवाला प्रवेश करितो. )

**दवंडी०**:—( दवंडी देऊन ) ऐका–ऐका–ऐका. भ्रमरावतींतील सर्व राजनिष्ठ प्रजाजनहो, ऐका. महाप्रतापशाली राजराजेश्वर मातंगाधिपति यांची सार्वभौमसत्ता कदंबाधिपति कंदर्प महाराजांनीं मान्य केल्यामुळें कदंब देश लौकरच मातंग साम्राज्यांत सामील करण्यांत येणार आहे. आणि या मातंगेश्वराच्या साम्राज्यसत्तेचें चिन्ह म्हणून चार घटकांनीं प्रतापचौकांतील कदंबाचा स्वातंत्र्यध्वज काढून त्या ठिकाणीं मातंगांचें वज्रांकित निशाण कंदर्प महाराजांच्या हस्तें उभारण्यांत येणार आहे. तेव्हां भ्रमरावतींतील तमाम लोकांनीं मातंगाधिपतीच्या सार्वभौमसत्तेला आपली मान्यता दर्शविण्यासाठीं या लौकरच उभारल्या जाणाऱ्या मातंगध्वजाला राजनिष्ठेची पहिली सलामी देण्यास प्रतापचौकांत हजर राहिलें पाहिजे असा कदंबाधिपति कंदर्प महाराज यांचा सक्त हुकूम आहे. ऐका–ऐका— (जातो. )

## प्रवेश पांचवा.

( प्रतापचौक. ध्वजासनावर कदंबांचें निशाण फडकत असून कालकूट व धीरसिंह कोतवाल कांहीं शिपायांसह तें काढण्यासाठीं ध्वजासनाजवळ उभे आहेत. )

**काल०**:—धीरसिंह, ध्वजासनावर चढून तें आपलें निशाण तेथून खालीं उतरा.

**धीर०**:—महाराज प्रतापादित्यांनी हें निशाण येथें रोविलें त्या वेळीं आपल्या पुढच्याच पिढींत तें येथून ढळेल असें त्यांस खास वाटलें नसेल.

**काल०**:—प्रतापादित्यांना काय वाटलें असेल आणि काय वाटलें नसेल याची उठाठेव तुम्हांला कशाला पाहिजे ?

**धीर०**:—उठाठेव म्हणून मी म्हणत नाहीं. पण महाराज प्रतापादित्यांनीं हें निशाण ह्या ठिकाणीं स्थापन केलें त्या वेळचा तो मंगलकारक देखावा माझ्या डोळ्यांपुढून कांहीं केल्या हालतच नाहीं.

**काल** :—तुमच्या डोळ्यांपुढून तो देखावा हालत नाहीं आणि आम्हाला त्याचें स्मरणही राहिलें नाही असे का तुम्ही समजतां ? पण करावयाचें काय ? आल्या भोगाला शांतपणें सादर झालेंच पाहिजे.

**धीर०**:—भोग आला कसला ? आणला. कंदर्प महाराज जर मातंगेश्वराशीं लढण्यास तयार झाले असते तर—

**काल०**:—चुप—महाराजांच्या निर्णयाविरुद्ध तोंडांतून शब्द काढणें म्हणजे राजद्रोह आहे. तेव्हां मनांतले उमाळे मनांत दाबून आपल्या कर्तव्याला मुकाट्यानें सादर व्हा. उगाच फाजील बडबड करूं नका.

**धीर०**:—प्रधानजी, मातंगांच्या गुलामगिरींतून कदंब देशास मुक्त करून हा स्वातंत्र्यध्वज या ठिकाणीं स्थापन करण्याला महाराज प्रतापादित्यांना केवढे क्लेश पडले आहेत आणि त्याच्यापायीं कदंब देशांतील किती नरवीरांचें रक्त सांडलें आहे याची आपणास कांहीं कल्पना आहे काय ?

**काल०**:—मला पूर्ण कल्पना आहे. पण असल्या फाजील कल्पना करीत बसण्याची ही वेळ नाहीं. मातंगेश्वराच्या सार्वभौम निशाणाची मिरवणूक

राजवाड्यापासून निघाली असून ती आतां इतक्यांत येथें येऊन पोहोंचेल. तेव्हां ती येथें यण्यापूर्वी या ध्वजासनावरून हें निशाण खालीं उतरलेंच पाहिजे. आपल्या कांहीं कल्पना असल्या तरी राजसेवेंत आपण राबत आहोंत तोंपर्यंत राजाज्ञा कशीही असली तरी ती आपण पाळलीच पाहिजे.

**धीर०:**—होय. राजसेवेचा त्याग करवत नाहीं तोंपर्यंत राजाज्ञा मला पाळलीच पाहिजे खरी. ( निशाणाकडे पाहून ) हे हतभागी विजयध्वजा, मला क्षमा कर. माझी इच्छा नसतांना केवळ राजाज्ञेच्या पालनाकरितां-पण छे-अशा नादान राजाज्ञेच्या पालनाकरितां मी या परमवंद्य स्वातंत्र्यध्वजाचा उपमर्द करण्यास प्राणांतींही तयार होणार नाहीं ( ध्वजासनापासून परततो. )

**काल०:**—अरे! हा काय चावटपणा मांडिला आहे तुम्हीं?

**धीर०:**—मी हे निशाण खालीं उतरणार नाहीं!

**काल०:**—काय? हें निशाण खालीं उतरणार नाहीं? कोतवाल तुम्ही शुद्धीवर आहात काय?

**धीर०:**—होय. मी चांगला शुद्धीवर आहें. आणि म्हणूनच हें अधम कृत्य करण्याचें साहस मला करवत नाहीं.

**काल०:**—राजाच्या अन्नावर आपला पिंड पोसून राजाज्ञेचें पालन करणें तुम्हांला अधमपणाचें वाटतें आं? शाबास-शाबास आहे तुमच्या अकलेची आणि इमानदारीची!

**धीर०:**—राजाचें अन्न! बरोबर आहे. मीं आजपर्यंत राजाचें अन्न खाल्लें आहे. तेव्हां त्या अन्नाशीं मला माझें इमान शाबूत राखलेंच पाहिजे. प्रधानजी, क्षमा करा. क्षणमात्र माझ्या मनावर मोहाचें पटल आलें होतें पण आपल्या शब्दांनीं ते आतां दूर झालें. राजाचें अन्न! बरोबर आहे. आपण मला वेळींच सावध केलेंत याबद्दल मी आपला फार आभारी आहें.

**काल०:**—तुमचे आभार मला नको आहेत. मला तें निशाण खालीं उतरावयास पाहिजे आहे. तेव्हां चला-चढा वर आणि काढा तें मुकाट्यानें खालीं.

**धीर०:**—होय. चढतोंच मी वर आणि काढतोंच तें खालीं. ( ध्वजासनावर चढूं लागतो तोंच तेजस्विनी कांहीं लोकांसह प्रवेश करते. )

**तेज०**:—खबरदार, उतरा खालीं. या निशाणाचा असा उपमर्द कराल तर तुम्हांला आपल्या प्राणास मुकावें लागेल.

**काल०**:—कोण ? तेजस्विनी ?–तेजस्विनी, आम्हांला असा अडथळा करूं नकोस. कोतवालांना वर चढूं दे व तें निशाण खालीं काढूं दे. आम्हांला तशी राजाज्ञा आहे.

**तेज०**:—तुमची राजाज्ञा तुमच्याजवळ ठेवा. मला तिची प्रतिष्ठा सांगू नका. ज्याला आपल्या राज्याची चाड नाहीं-राजसिंहासनाची किंमत नाहीं-राजध्वजाची पर्वा नाहीं तो राजा कसला ? हैवान तो. मला त्याच्या आज्ञेची अगर हुकुमाची काडीइतकीही मातब्बरी वाटत नाहीं. कोतवाल, मुकाट्यानें खालीं उतरा. मी या निशाणाला तुमचा पापी स्पर्श होऊं देणार नाहीं. ( कोतवाल ध्वजापासून परत उतरूं लागतो. )

**काल०**:—अहो, उतरता काय ? चला-परता. चढा वरती. तो पहा-मिरवणुकीच्या वाद्यांचा नाद जवळ ऐकूं येऊं लागला. तेजस्विनी, तूं राजाज्ञेचा भंग करीत आहेस-आमच्या कर्तव्यांत आम्हांला अडथळा करीत आहेस-हें चांगलें नव्हे. याचा परिणाम नीट होणार नाहीं. आतांपर्यंत महाराजांच्या भिडेमुळें आम्हीं तुझी गय केली. आणि तूं महाराजांचा हद्दपारीचा हुकूम धुडकावून लावलास तरी आम्ही तुझ्या वाटेस गेलों नाहीं. पण आतां तुझी गय केली जाणार नाहीं तूं जर निमूटपणें आम्हांला हें निशाण उतरूं देणार नाहींस तर तुला त्याबद्दल भयंकर शासन भोगावें लागेल.

**तेज०**:—या माझ्या परमपूज्य राजध्वजासाठीं वाटेल तें शासन भोगण्याला मी तयार आहें. कर्तव्याला अकर्तव्य समजून तुम्ही जर आज आपल्या राजसत्तेचा व राजैश्वर्याचा आपल्या हातानें विध्वंस करण्यास तयार झाला आहांत तर तुमचा प्रतिकार करणें हा माझा पवित्र धर्म आहे. या माझ्या श्रेष्ठ प्रजाधर्माचें पालन करीत असतां माझ्यावर कशाही आपत्ति कोसळल्या तरी त्यांची मला यत्किंचित् पर्वा नाहीं. तेव्हां चला दूर व्हा. या कदंबाच्या राजध्वजाजवळ मी कोणालाही फडकूं देणार नाहीं. ( पडद्यांत वाद्यांचा नाद व मातंगेश्वराचा जयघोष. )

**काल०**:—तेजस्विनी, अतिप्रसंग करूं नकोस. दूर हो. आम्हांला तें

निशाण खालीं उतरूं दे. पहा–ही महाराजांची स्वारी मातंगेश्वरांचें निशाण घेऊन आलीच. कोतवाल, चढा–चढा वर आणि काढा तें निशाण खालीं.

( कंदर्प, सौदामिनी, शृंगाल, हालाहल इ० प्रवेश करतात. )

**सौदा०:**—( पाहून ) काय ? कालकूट, अद्यापि हें निशाण येथें उभें आहे ?

**तेज०:**—होय. हा कदंबाचा वैभवशाली राजध्वज अद्यापि येथें उभा आहे आणि पुढेंही तो येथें असाच फडकत राहणार.

**कंदर्पः**—तेजस्विनी, तूं हें काय मांडलें आहेस ?

**तेज०:**—कदंबाच्या राजसिंहासनाप्रीत्यर्थ आरंभिलेल्या पवित्र आत्मयज्ञाचें हें मंगलाचरण आहे–स्वातंत्र्यादि उज्ज्वल व देदिप्यमान् रत्नें धारण करणाऱ्या संग्रामसागराचें मंथन करण्यासाठीं कदंबराष्ट्रमंथा त्याच्या तळाशीं सोडण्याचा हा मंगल समारंभ आहे.

**सौदा०:**—पाहिलेंत हें आपल्या औदार्याचें फळ. हिनें आपला हद्दपारीचा हुकूम पायीं तुडविला त्या वेळीं हिला कैद करून सुळावर चढविण्यासंबंधानें मीं आपणाला बजाविलें. परंतु आपल्या प्रेमाला त्या वेळीं उसळी फुटून मोठ्या उदारपणानें आपण तिचा तो अक्षम्य अपराध पोटांत घातलांत. आतां ऐका तिचें रणपांडित्य !

**शृगालः**—तेजस्विनी, हा राजद्रोह आहे.

**सौदा०:**—नव्हे–नव्हे–हें साक्षात् बंड आहे.

**तेज०:**—तुम्हांला वाटेल तें नांव तुम्ही या माझ्या कृत्याला द्या. मला त्याची परवा नाहीं. राजद्रोह–बंड असल्या भीषण शब्दांनीं भेकडांच्या अंतःकरणांत धडकी भरेल–या तेजस्विनीच्या अंतःकरणांत भरणार नाहीं. आज कंदबभूमींत खरे राजद्रोही कोणी नांदत असतील तर जे कादंब राजसिंहासनाला परक्यांच्या पायीं चरणस्पर्शानें भ्रष्ट करूं पहात आहेत ते आहेत. आज कदंबभूमींत खरे बंडखोर कोणी वावरत असतील तर जे कादंबराजध्वजाला परक्यांच्या पायाशीं बळी देण्यास सज्ज झाले आहेत ते आहेत. मी राजद्रोही नाहीं–मी बंडखोर नाहीं.

**कंदर्पः**—काय ? तेजस्विनी, तूं मला राजद्रोही म्हणतेस–मला बंडखोर म्हणतेस ?

**तेज०**:—होय कंदर्पा, मी तुला राजद्रोही म्हणत्यें.–तुला बंडखोर म्हणत्यें. तूंच कादंब राजसत्तेचा द्रोह मांडला आहेस–तूंच कादंब-राजसत्तेचा विध्वंस करण्यासाठीं तिच्या विरुद्ध बंड उभारलें आहेस !

**कंदर्पः**—वाहव्वा–वाहव्वा : राजा राजद्रोही ! राजा बंडखोर ! धन्य–धन्य आहे तुझ्या अकलेची आणि ज्ञानाची !

**तेज०**:—परक्यांच्या गुलामगिरींत मान अडकवून घेण्यास तयार झालेल्या षंढा, 'राजा' या परम पवित्र नांवानें स्वतःस अळविण्याची तुला लाज कशी वाटत नाहीं ? तूं राजा कसला ? शेणामेणाचें बाहुले तूं. ज्याला आपल्या राजसत्तेची कदर नाहीं–राजसिंहासनाची कदर नाहीं–राजध्वजाची कदर नाहीं त्या तुला राजतेजोहीन पामराला राजा कोण म्हणेल ? तुझ्या-सारखीं काडीमोडीचीं धांदरटे असतील तीं तुझ्यासारख्या नादानाला 'राजा' म्हणून डोक्यावर घेऊन नाचतील. माझ्यासारखी पोलादी कांब तुला मुर्दा-डाला प्राण गेला तरी राजा मानणार नाहीं व म्हणणार नाहीं.

**सौदा०**:—महाराज शेणामणाचें बाहुले आणि आम्ही काडीमोडीचीं धांदरटें काय ? ठीक आहे. त्याची परिक्षा लौकरच लागेल. पण तो वाद सध्यां आम्हांला तुझ्याशीं घालावयाचा नाहीं. आम्हाला तें निशाण उतरून त्याच्या ठिकाणीं हें निशाण स्थापावयाचें आहे. तेव्हां मुकाट्यानें खालीं उतर आणि कोतवालांना तें निशाण काढूं देऊन महाराजांना हें निशाण त्या जागीं उभारूं दे.

**तेज०**:—प्राण गेला तरी हें कदंबाचें निशाण काढून त्या जागीं तें मातंगांचें निशाण मी तुम्हांला उभारूं देणार नाहीं.

**कंदर्पः**—काय मगदूर आहे तुझी असें करायची ! या कंदर्पाची इच्छा आहे तर त्या निशाणाच्या जागीं हें निशाण फडकलेंच पाहिजे.

**तेज०**:—मातंगांनीं कादंबांना रणांगणावर पराभूत केल्यावाचून हा राज-ध्वज येथून ढळणार नाहीं, व तें निशाण या ध्वजासनाच्या पायरीवर चढ-णार नाहीं.

**शृगालः**—मातंगेश्वराच्या तलवारीचें पाणी किती तिखट आहे हें तूं जाणत नाहींस?

**तेज०:**—कादंबांच्या रक्ताला तलवारीच्या तिखट पाण्याचा इतका परिचय झालेला आहे कीं, त्याला कोणाच्याही तरवारीचें किंचितही कौतुक वाटत नाहीं. मातंगेश्वराला आपल्या तरवारीच्या तिखट पाण्याची एवढी घमेंड वाटत असेल तर तें त्यानें कादंबाना समरांगणावर दाखविण्याची तसदी घ्यावीच. म्हणजे तेथें त्याची तरवार जो प्रकाश पाडील त्यावर त्याच्या निशाणाची जागा आपोआपच ठरेल.

**शृगालः**—पण ती जाण्यापूर्वीच ठरविली गेली आहे.

**तेज०:**—कोणाकडून ठरविली गेली आहे?

**सौदा०:**—महाराज कंदर्प यांच्याकडून ठरविली गेली आहे.

**कंदर्पः**—होय. आमच्याकडून ठरविली गेली आहे.

**तेज०:**—आपल्याला हा निकाल देण्याचा अधिकारच नाहीं कदंब-राजसिंहासनाला लाथ मारून ज्या क्षणीं परक्याच्या गुलामगिरीचा शिक्का आपण आपल्या हातानें आपल्या कपाळावर मारून घेतलात त्या क्षणींच आपलें सर्व सत्ताधिकार नष्ट झाले. आतां हा अधिकार एकट्या संग्रामदेवतेनें आपल्या हातांत ठेवला आहे आणि तिच्या मंदिरांत जाऊनच आपण या प्रकरणाचा निकाल लावून घेतला पाहिजे.

**शृगालः**—तेजस्विनी, तुझें हें उद्दामपणाचें भाषण म्हणजे मातंगेश्वराला युद्धाला आव्हानच आहे.

**तेज०:**—होय. मातंगेश्वराला हें युद्धाचें आव्हानच आहे. हा कादंबांचा राजध्वज येथून उखडून काढून त्या ठिकाणीं आपलें निशाण रोंवण्याची मातंगेश्वराची जर इच्छा असेल तर त्यानें कादंबांशीं रणांगणावर दोन हात केलेच पाहिजेत.

**कंदर्पः**—तेजस्विनी, सारा कदंबदेश मातंगेश्वराची साम्राज्यसत्ता मान्य करण्यास तयार झाला असतांही चारदोन भिकारड्या साथीदारांच्या जोरावर अखिल कदंबराष्ट्राच्या नांवानें युद्धाच्या आव्हानाचा उच्चार करतांना तुझ्या जिवाला कांहींच लाज कशी वाटत नाहीं?

**तेज०:**—लाज कशाकरितां वाटावयाची? आपल्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्यासाठीं तळहातावर शिरें घेऊन या कादंब–राजध्वजासभोंवार गोळा झालेले हे हाताच्या बोटांवर मोजण्याइतके स्वातंत्र्यभक्त हेंच खरें कादंबराष्ट्र आहे. आपली स्वातंत्र्याची पूर्वपरंपरा सोडून परदास्याचा फांस खुषीनें आपल्या गळ्यांत अडकवून घेण्यास जे पामर तयार झाले आहेत तें मुळीं खरें राष्ट्रच नाहीं.

**कंदर्प:**—काय करावें? तुझें फिरून गेलेलें डोकें अजून ताळ्यावर कसें येत नाहीं हेंच मला समजत नाहीं.

**सौदा०:**—समजणार कसें? समजून घेण्याची इच्छा असेल तर समजणार ना? पण आपल्याला मुळीं समजून घेण्याची इच्छाच नाहीं. मी पहिल्यापासून आपल्या कानांकपाळीं ओरडत्यें आहे कीं, लकडीशिवाय ही मकडी वळायची नाहीं. पण माझें ऐकतो कोण? मघांपासून मी पहातें आहे. आपण आपले तिच्याशीं वाद घालीत बसला आहांत. ही काय वादाची का वेळ आहे? दूर होते नाहीं म्हणतें–सैनिकांकडून गचांडी देववून बाजूला करावयाची. पण तिच्या अंगाला वाऱ्याचा धक्का बसलेलाही आपल्याला पहावत नाहीं त्याला करावयाचें काय? मग आपल्याला हिचें हें वेड घालविण्याचा मार्ग सुचणार कसा आणि कोणीं सुचविला तर रुचणार तरी कसा? दांडक्यानें तोंड ठेंचल्यावांचून या बेताल बायकोचे चाळे केव्हाही थांबणार नाहींत, हें अगदीं पक्कें लक्षांत ठेवा.

**शृगाल:**—बरोबर आहे राणीसरकारांचें म्हणणें. या माथेफिरू बायकोशीं आपण जन्मभर जरी अशी हुज्जत घालीत बसलांत तरी ही ताळ्यावर येणार नाहीं. हिला सोटेशाहीचा प्रसादच मिळाला पाहिजे.

**काल०:**—आम्हीं केव्हांच हिचा बंदोबस्त केला असता. पण महाराजांच्या पुढें आमचा कांहीं इलाजच चालत नाहीं.

**सौदा०:**—थांबा–महाराजांची हिंमत होत नाहीं तर मीच करतें बंदोबस्त हिचा. हालाहल, सैनिकांना पुढें बोलवा.

**हाला०:**—जशी राणीसरकारांची आज्ञा. ( तसें करतो. )

**सौदा०:**—कोतवाल, आतां चढा वर आणि या चढेल बायकोला व तिच्या साथीदारांना लाथा घालून खालीं काढा.



**धीरसिंहः**--मी सिंहासनाचा नोकर आहे-माणसाचा नोकर नाहीं. (पान ७८).

**धीर०**:—राणीसाहेब, माफ करा. माझा पाय वर चढूं शकत नाहीं आणि माझा हात या स्वातंत्र्यदेवतेच्या अंगास स्पर्श करण्यास धजत नाहीं.

**कंदर्प**:—काय? तुमचा पाय वर चढूं शकत नाहीं? आणि या नादान बायकोच्या अंगास स्पर्श करण्यास तुमचा हात धजत नाहीं!

**सौदा०**:—कोतवाल झालांत आणि असले भागुबाईपणाचे शब्द तोंडावाटे काढण्याला तुम्हांला शरम वाटत नाहीं!

**धीर०**:—महाराजांच्या दुस्मानावर तुटून पडण्याला सरकारांनीं हुकूम करावा आणि मग कोतवालाचें नांव सांगण्याला लागणारी मर्दुमकी या धीरसिंहाच्या जिभेंतच नव्हे तर मनगटांतही आहे किंवा नाहीं याचा सरकारांनीं पडताळा पहावा.

**शृगाल**:—मग हे लोक कोण आहेत? दुस्मान नाहींत?

**धीर०**.—नाहींत. वकीलसाहेब, हे लोक दुस्मान नाहींत. हे लोक महाराजांचे दोस्त आहेत—इतकेंच नव्हे तर सच्चे इमानदार दोस्त आहेत. महाराजांच्या या वैभवशाली राजध्वजाचें परकीयांच्या पापी स्पर्शापासून रक्षण करण्यासाठीं व त्या योगें महाराजांचें महाराजपण निष्कलंक राखण्यासाठीं जे आपल्या प्राणावरही तिलांजलि देण्यास तयार झाले आहेत त्यांना महाराजांचे दुस्मान कोण म्हणूं शकेल?

**काल०**:—बस्, तुमची वटवट बंद करा. असलीं उर्मटपणाचीं पागल भाषणें करण्यासाठीं कांहीं तुम्हांला कोतवाल नेमण्यांत आलेलें नाहीं. तुम्ही सरकारचे नोकर आहांत आणि सरकारचा हुकूम बिनतक्रार पाळणें एवढेंच तुमचें काम आहे.

**धीर**:—सरकारांनीं कदंब-राजसिंहासनाची सेवा करण्याचा हुकूम केला असता तर त्याच्या तामिलीसाठीं या जीवाची कुरबानी करण्यालाही मीं मागेंपुढें पाहिलें नसतें. पण सरकार मला हा कादंबराजसिंहासनाचा उपमर्द करण्यास सांगत आहेत. तेव्हां त्यांची आज्ञा पाळणें मला शक्य नाहीं. मी सिंहासनाचा नोकर आहें—माणसांचा नोकर नाहीं. तेव्हां सिंहासनाशीं विरोध करून माणसांची नोकरी बजावण्यासाठीं जर मला ही कोतवालाची तलवार देण्यांत आली असेल तर ती ही परत घ्या. मला तिची जरूर नाहीं. (तलवार

पुढें फेंकतो. ) बस् यापुढें हा धीरसिंह आपला नोकर नाहीं, आपला बंदा नाहीं आणि आपला शब्द झेलावयाची जबाबदारी आतां याच्या शिरावर राहिलेली नाहीं. ( जाऊं लागतो. )

**तेज०:**—शाबास ! शाबास ! ! खरा मर्द—खरा बहाद्दर ! !

**सौदा०:**—थांब विश्वासघातकी राजद्रोह्या थांब. सरकारांच्या हुकुमाची अशी अवहेलना करून तुला येथून असा बेसजा निसटून जातां येणार नाहीं. हालाहल, या हरामखोरांला एकदम कैद करा. आणि त्या बंडखोरांना खालीं ओढून काढून ध्वजासनाचा मार्ग मोकळा करा.

**हाला०:**—शिपायांनो, कोतवालाला फौरन कैद करा. ( शिपायी धीरसिंहास पकडतात. ) तेजस्विनी, मुकाट्यानें खालीं उतर. नाहीं तर मी लष्करी शिस्तीचा माणूस आहें. मी हुज्जत घालीत बसणार नाहीं. एकदम बडग्याला प्रारंभ करीन.

**तेज०:**—खुशाल कर. तुझ्या बडग्याचें स्वागत करावयाला आमची तयारी आहे.

**हाला०:**—शिपायांनो, चढवा हल्ला. ( शिपायी हल्ला चढवितात चकमक उडते. तेजस्विनीस व तिच्या साथीदारांस खालीं ओढून काढतात. ध्वजासन मोकळें होताच सौदामिनी ध्वजासनावर चढते व कदंबाचें निशाण काढते. )

**सौदा०:**—( निशाण हातांत घेऊन तेजस्विनीस ) तेजस्विनी हें पहा—हें तुझ्या कदंबाचें निशाण तूं जिवंत असून तुला लाथाडून तुझ्या डोळ्यादेखत या ध्वजासनावरून पदच्युत केलें ! ( निशाण घेऊन खालीं उतरते ) महाराज, आतां तें निशाण त्या जागीं स्थापन करा. ( कंदर्प मातंगाचे निशाण ध्वजासनावर उभारतो. ) तेजस्विनी, पहा तें मातंगाचें निशाण या कदंबाच्या निशाणाच्या जागीं आपल्या सार्वभौम ऐश्वर्याच्या तोऱ्यानें फडकूं लागलें, तेंही चागलें डोळे उघडून पहाः— ( पडदा पडतो. )

## अंक २ रा समाप्त.

# अंक तिसरा.



## प्रवेश पहिला.

[ स्थळः-राजवाड्यांतील एक बाग. )

( मातंग युवराज, कंदर्प, शृंगाल, कालकूट, हालाहल, शिशुपाल, पशुपाल इत्यादि मंडळी वनविहार करीत आहेत. नृत्यगायनादि चालू आहे. )

**युवराजः**--( नृत्यगायन आटोपल्यावर ) तहाविरुद्ध उद्भवलेल्या चळवळीचा आतां अगदी मागमूस राहिला नाहींना ?

**काल०**:--तेजस्विनीला कैद केल्यापासून आतां सर्वत्र शांतता नांदत आहे.

**युव०**:--तेजस्विनी एवढी वजनदार स्त्री आहे काय ?

**काल०**:--वजनदार कसली ? पण ती एक मोठी उपद्व्यापी बायको आहे एवढें मात्र खरें.

**शिशु०**:--बरोबर आहे प्रधानजींचें म्हणणें.

**पशु०**:--अगदीं-भोलेनाथ !

**युव०**:--तिला एकदां पाहावें अशी आमची इच्छा आहे.

**कदर्पः**--युवराजांची इच्छा असेल तर तिला केव्हांही युवराजांना दाखवितां येईल.

**शिशु०**:--हो. त्यांत काय कठिण आहे ?

**पशु०**:--राजा बोले दळ हाले भोलेनाथ !

**युव०**:--मग आतांच कां आणवीत नाहीं ?

**काल०**:--तिला पाहून युवराजांना आनंद होईल असें मला वाटत नाहीं.

**शिशुपालः**--हो-तेंही खरेंच.

**पशुपालः**--अगदीं-भोलेनाथ ?

**युव०**:--कां ? ती पूतना अगर शूर्पणखा आहे कीं काय ?

**काल०**:—पूतना अगर शूर्पणखा पुरवल्या. ती त्यांच्यावरही ताण आहे.

**शिशुपाल**:— बरोबर आहे प्रधानजींचें म्हणणें.

**पशु०**:— अगदीं—भोळेनाथ !

**युव०**:—म्हणजे ? ती फार सुंदर आहे असें आम्हीं ऐकलें तें खोटेंच का ?

**काल०**:—तें खोटें नाहीं. पण सुंदर असली तरी ती मातंगांची पक्की द्वेष्टी आहे.

**शिशु०**:— हां—महाद्वेष्टी आहे.

**पशु०**:—अगदीं भयकर द्वेष्टी आहे. भोळेनाथ !

**युव०**:—द्वेष्टी वाटेल तेवढी असू द्या. त्याची आम्हांला पर्वा नाहीं. आम्हांला तिचें लावण्य पहावयाचें आहे. आणि तें तिच्या ठिकाणीं आहे. तेव्हां एवढें आम्हांला बस् आहे. कंदर्प, आणवा तिला आतांच येथें. आजच्या आनंदीआनंदात तिच्या लोकोत्तर सौंदर्याच्या दर्शनाचाही आनंद आज आम्ही लुटून घेऊं.

**कंदर्प**:—कालकूट, जा आणि तेजस्विनीला येथें घेऊन या.

**काल०**:—जशी सरकारांची आज्ञा. (शिशुपालास एकीकडे) अरे तुम्ही दोघे जाऊन सौदामिनीराणीसाहेबांना ही वर्दी पाहोंचवा. ( शिशुपाल व पशुपाल जातात. ) हालाहल, चला. ( काळकूट व हालाहल जातात. )

**युव०**:—तेजस्विनीचा आपला विवाह ठरला होता म्हणे ?

**कंदर्प**:—ठरला होता, पण आतां आमचा विचार बदलला. तहाविरुद्ध चळवळ केल्यामुळें ती आतां आमच्या मनांतून अगदीं उतरली आहे.

**युव०**:—तिनें आपला हट्ट सोडून तहाला संमति दिली तर ?

**कंदर्प**:—छे—तें शक्य नाहीं.

**शृगाल**:—शक्य तर नाहींच. पण समजा शक्य झालें तर !

**कंदर्प**:—तर—तर पाहतां येईल पुढें.

**युव०**:—ठीक आहे. अजून अवधि आहे. बाकी तेजस्विनीचा व आपला विवाह झाल्यास आम्हांला संतोष होईल.

**सौदा०**:—( प्रवेश करून ) तेजस्विनीला इकडे आणण्यासाठीं कालकूटांना पाठविलें आहे !

**कंदर्प:**—होय.

**सौदा०:**—तें कशाकरितां ?

**कंदर्प:**—युवराजांना तिला एकदां पाहावयाचें आहे.

**युव०:**—होय. तिला एकदां पाहावें अशी आमची इच्छा आहे.

**सौदा०:**—पण तिला पहावयाचें तें काय ? बायकोसारखी बायको ती.

**युव०:**—बायका बायकांसारख्या असतात–पुरुषांसारख्या नसतात–हेंही आम्हाला कळत नाहीं अशी का बाईसाहेबाची कल्पना आहे ?

**सौदा०:**—अशा कल्पनेनें मी बोलल्यें नाहीं. युवराजांना राग आला असेल तर त्यांनीं मला क्षमा करावी. माझ्या म्हणण्याचा अर्थ एवढाच होता कीं, युवराजांसारख्या थोरांनीं तिला पाहण्याची इच्छा करावी एवढी कांहीं तिची थोर योग्यता नाहीं.

**युव०:**—योग्यतेच्याच हिशोबानें डोळ्यांचा उपयोग करावयाचा म्हटल्यास आम्हांला आरशांतल्या आपल्या प्रतिबिंबाशिवाय जगांतील कोणत्याच सजीव-निर्जीव वस्तूंवर आपली उघडी नजर फेंकतां यावयाची नाहीं. तथापि योग्यतेच्या दृष्टीनें देखील तेजस्विनी ही एकदां पाहण्यासारखी चीज खास आहे असें आमचें मत आहे.

**सौदा०:**—युवराजांचेंच मत आहे तेव्हां तें चुकीचें कसें म्हणावयाचें ? बाकी युवराजासारख्या थोर पुरुषाच्या दृष्टीस पडण्याइतकी लायकी तिच्या अंगीं आहे असें निदान मला तरी कांहीं वाटत नाहीं.

**युव०:**—आपण माणसाची योग्यता कशावरून ठरवितां ? रूपावरून का गुणावरून ?

**सौदा०:**—दोन्हीवरूनही ठरवीत नाहीं. माझें माप अगदीं वेगळेंच आहे. माणूस आपल्याशीं कसें वागतें यावरून मी त्याची लायकी नालायकी ठरवित्यें. माझ्याशीं जें माणूस प्रेमानें वागेल तें चांगलें व जें माझा द्वेष करील तें वाईट असें माझें आपलें सोपें आणि अगदीं सुतासारखें सरळ गणित आहे.

**युव०:**—विलक्षणच गणित आहे आपलें. असो. आम्ही कांहीं तेजस्विनीला अद्यापि प्रत्यक्ष पाहिलेलें नाहीं. तथापि तिच्यासंबंधानें आम्ही जें

कांहीं कर्णोपकर्णी ऐकलें आहे त्यावरून ती एक सुंदर व सद्गुणी स्त्री आहे अशी आमची समजूत झाली आहे.

कंदर्प:—युवराजांची समजूत अगदीं बरोबर आहे.

सौदा०:—( चिडून ) बरोबर आहे ?

कंदर्प:—अलबत् तेजस्विनी सुंदर नाहीं ?

सौदा०:—सुंदर असेल कदाचित्. पण सद्गुणी आहे का ?

कंदर्प:—म्हणजे यांत काहीं शंका आहे वाटतें ?

सौदा०:—धन्य धन्य झाली आपली ! आपल्याविरुद्ध बंड करणाऱ्या बंडखोर स्त्रीला आपण सद्गुणी म्हणता तेव्हां काय म्हणावें आपल्याला ?

युव०:—उदार म्हणावें-थोर म्हणावें बंडखोरी हा मानवी कायद्यानें केवढाही भयंकर अपराध असला तरी त्याची दुर्गुणांत गणना करितां येत नाही. किंबहुना स्वातंत्र्याकरितां बंड करण्याची प्रेरणा सद्गुणी व सुशील अंत:करणावांचून इतरत्र होऊच शकत नाही.

सौदा०:—स्वत: दिग्विजयी जेतेच जितांच्या बंडखोरीची प्रशंसा करूं लागल्यावर इतरांनीं काय बोलावयाचें ?

युव०:—जेत्यानीं नेहमीं जितांची निंदाच केली पाहिजे असेंही आपलें एखादें सोपें आणि सुतासारखे सरळ गणित आहे की काय ? जेते म्हणजे अडाणी, क्रूर, जंगली पशुच असले पाहिजेत असें कांहीं शास्त्र नाहीं. जित असो वा जेता असो तो जोंपर्यंत मनुष्यजातीचे पवित्र नांव सांगेल तोंपर्यंत त्यानें आपल्या ठिकाणीं माणुसकीची जाणीव सदैव जागृत ठेवलीच पाहिजे.

कंदर्प:—युवराजांचें म्हणणें यथार्थ आहे. ( कालकूट प्र क. )

काल०:—तेजस्विनीला आणलें आहे. हुकूम होईल तर येथें हजर करितों.

कंदर्प:—आणा तिला आंत.

काल०:—जशी महाराजांची आज्ञा ( जातो )

युव०:—कंदर्प, आपण तिचा आमचा परस्परांना परिचय करून द्या.

सौदा०:—परिचय काय करून द्यावयाचा ? आपण मातंग देशाचे दिग्विजयी युवराज आणि ती एक सामान्य कैदी. तेव्हां तिच्याशीं एवढा शिष्टाचार पाळण्याचें कारण काय ?

युव०:—बाईसाहेब, आपण समजतां इतकी हलक्या दर्जाची कैदी नाही ती. चोर दरवडेखोरांत आणि बंडखोर या दुष्ट नांवानें ओळखिल्या जाणाऱ्या स्वातंत्र्यवीरांत जमीनआस्मानाचें अंतर आहे दुर्दैवानें अपेशी ठरली म्हणून ती आज आमची कैदी झाली आहे. नाहींतर आज आम्हाला बरोबरीच्या नात्यानेंच तिच्याशीं गोष्टी कराव्या लागल्या असत्या. अगर आमच्या नशिबानें उलट खाल्ली असती तर उलट आम्हांलाच तिच्यापुढें कैदी म्हणून उभ राहावें लागले असतें तेव्हां जेथें केवळ कार्याच्या यशापयशावरच माणसाचा लौकिक अवलंबून असतो तेथें त्याची खरी किंमत लावण्यासाठीं यशापयशांच्या मर्यादेपलिकडेच नजर टाकली पाहिजे.

कंदर्पः—युवराजाचे शब्द खऱ्या दिग्विजयी वीराला शोभण्यासारखेच आहेत दुस्मान अपेशी ठरला एवढ्याच कारणामुळें त्याची योग्यता कवडीमोल ठरविणें म्हणजे आपल्या मनाचें हलकेंपण उघड करणें आहे. (काल० व हाला० शृंखलांनीं बद्ध केलेल्या तेज० ला आणतात.)

युव०:—(पाहून) हें काय ? शृंखला न काढतां तुम्ही या शूर स्त्रीला आमच्यापुढें आणलेत ! कालकूट, तुम्हांला दरबारी रीतिरिवाज कांहीं ठाऊक आहेत का नाहींत ?

सौदा०:—आमच्या दरबारचा असाच रिवाज आहे. बंडखोर बदमाषांना राजापुढें आम्ही कधींच मोकळे हजर करीत नाहीं.

युव०:—तुमच्या दरबारचा असा रिवाज असेल—आमच्या दरबारचा असा रिवाज नाहीं. राजकीय कैदी त्यांच्या दर्ज्यास शोभेल अशा मानानेंच आमच्या दरबारांत आमच्यापुढें पेश केले जातात. या वेळीं जरी आम्ही कदंबेश्वरांच्या राजवाड्यांत असलों तरी कैदी आमच्यापुढें पेश करावयाचा आहे. तेव्हां तो आमच्या दरबारच्या शिरस्त्याप्रमाणेंच आमच्यापुढें पेश केला गेला पाहिजे.

कंदर्पः—हालाहल, तिच्या शृंखला काढा व तिला मोकळी करा. (हालाहल तसें करतो.)

युव०:—त्यांना बसण्याला आसन द्या. (नोकर तसें करतात.) कंदर्प आपण आतां यांना आमचा परिचय करून द्या.

तेज०:—आपल्या परिचयाची मला कांहीं जरूर नाहीं.

कंदर्पः—तुला जरूर नसली तरी आम्हांला जरूर आहे. हे मातंगेश्वरांचे दिग्विजय सेनानी मातंग युवराज आहेत व ते आज आमचे सन्माननीय पाहुणे आहेत.

तेज०:—सन्माननीय पाहुणे आहेत! सर्वस्वासह यजमानाला गिळंकृत करणाऱ्या सन्माननीय पाहुण्यांची ही नवीनच जात जगांत पैदा झालेली दिसते.

कंदर्प:—तेजस्विनी, दिग्विजय जेत्यांच्यासंबंधानें बोलताना जितांनीं जिभेला थोडा आवर ठेविला पाहिजे.

तेज०:—ते जित असतील ते आवर ठेवतील. मी कोणाची जित नाहीं आणि माझा कोणी जेता नाहीं; तेव्हां मला कोणासंबंधानेंही बोलतांना जिभेचा लगाम आखडण्याचें कांहीं कारण नाहीं.

युव०:—बरोबर आहे. आपण जोंपर्यंत आपला स्वातंत्र्याचा आग्रह सोडलेला नाहीं तोंपर्यंत आपणाला जित समजणें चुकीचें आहे. पण तें राहूं द्या आपण आधीं त्या आसनावर बसा.

तेजः—माफ करा. आपल्या सत्काराचा स्वीकार करण्याचा मला हक्क आहे असें मला वाटत नाहीं.

युव०:—कां वाटत नाहीं?

तेज०:—कारण मी आपली शत्रु आहें. आणि आपली कैदी या नात्यानें मला आपल्यापुढें उभें करण्यांत आलें आहे.

युव०:—आपलें उत्तर शूर स्त्रीच्या उमदेपणाला साजेसेंच आहे. पण आम्हीं आपल्याला या वेळीं आमच्या शत्रु अगर कैदी म्हणून येथें आणविलेलें नाहीं.

तेज०:—आपण कदाचित् तसें आणविलें नसेल. पण मी आपल्यापुढें शत्रुत्वाचें नातें मनांत जागतें ठेवूनच उभी आहें.

युव०:—आपल्यासारख्या दिलदार स्त्रीकडून आमच्यासंबंधानें असा अन्याय होईल असें आम्हांला वाटत नाहीं. आमच्या चित्तांत आपल्यासंबंधानें मित्रत्वाची भावना जागृत झाली आहे. तेव्हां आपल्याही चित्तांत आमच्यासंबंधानें स्नेहभाव उत्पन्न झालाच पाहिजे.

तेज०: —पुढचें कांहीं सांगवत नाहीं. पण आज मात्र तसें होणें अगदीं अशक्य आहे.

युव०: —कां अशक्य आहे?

तेज०:—अनायासानें जेतृपदाचा लाभ झालेल्या धूर्त भाग्यवंतांच्या तोंडीं आपण वापरीत आहांत ही औदार्याची भाषा शोभते. परंतु जेत्यांच्या जेतृत्वामुळें सर्वस्वाचा नाश होऊन ज्यांच्या कपाळीं परदास्याचें लांछन लागलें आहे त्या हतभाग्यांच्या ठिकाणीं हें औदार्य संभवूं शकत नाहीं.

२१ पद्—गझल—" दिलहिन काबूमे तो०—"

**परवशता उरिं जोंवरी। खर शल्य सलें हें॥**
**अरिवरि तोंवरि प्रेमें। मन केंवि भुलें हें॥ ध्रु०॥**
**भडकतो क्रोध हृदयांत। बघतां त्यासि वैभवांत॥**
**घ्यावया सूड दिनरात॥ जित चित्त जळे हें॥ १॥**

युव०:—मग महाराज कंदर्प आमच्याशीं स्नेहभावानें कसे वागत आहेत?

तेज०:—मी बोलल्यें तें जिवंत माणसांच्यासंबंधानें बोलल्यें. मेल्या मढ्यांच्यासंबंधानें बोललें नाहीं.

कंदर्पः—म्हणजे तूं आम्हांला मेलेलीं मढीं समजतेस काय?

तेज०:—होय. मी आपणाला श्वासोच्छ्वास करणारीं मेलेलीं मढींच समजतें.

सौदा०:—हा महाराजांचा अपमान आहे.

तेज०:—असेल. तुमच्या महाराजांच्या मानापमानाची पर्वा करण्याचें मला कारण काय?

काळः—कारण काय? ते राजे आहेत आणि त्यांचा मान तूं ठेवलाच पाहिजे.

तेज०:—ते ज्यांचे राजे असतील त्यांनीं त्यांच्या मानापमानाची काळजी घ्यावी. माझे कांहीं ते राजे नाहींत. माझा राजा परमेश्वर आहे आणि फक्त त्याच्या मानापमानाची चिंता वहाणें हा माझा धर्म आहे.

**युव०:**—पण राजा हा तरी परमेश्वराचाच एक अंश आहे.

**तेज०:**—राजा परमेश्वराचा अंश असेल. पण राजाचें निर्जीव चित्र कांहीं परमेश्वराचा अंश खास नव्हे.

**सौदा०:**—म्हणजे महाराज राजाचें चित्र काय ?

**तेज०:**—तुमच्या या महाराजांना 'राजाचें चित्र' म्हणणें म्हणजे सुद्धां त्यांचा मोठा गौरव करण्यासारखेंच आहे. कारण चित्र निर्जीव असलें तरी त्याला निदान कांहीं रंगरूप तरी असतें, पण यांना तर तें सुद्धां नाहीं. हा म्हणजे एक शुद्ध मातीचा गोळा आहे; आणि तुम्ही सर्वांनीं तोंडानें 'राजा' 'राजा' असा कंठशोष करीत त्या गोळ्याचें माकड बनविण्याचा उद्योग चालविला आहे !

**सौदा०:**—पाहिलें. एवढ्यासाठीं मीं हिला येथें आणवूं नका म्हणून म्हणत होत्यें.

**काल०:**—आणि मी सुद्धां महाराजांना हेंच सांगितलें होतें.

**सौदा०:**—युवराजासारख्या थोर दिग्विजयी पाहुण्यासमोर कदंबेश्वरांना वाटेल तशा अद्वातद्वा शिव्या देणें म्हणजे काय हें ? कालकूट, या माथेफिरू अवदसेला आतांच्या आतां येथून घेऊन चला कसे.

**तेज०:**—घेऊन चला. मलाही येथें थांबण्यांत कांहीं आनंद वाटत नाहीं.

**युव०:**—थांबा. आम्हांला त्यांच्याशीं आणखी थोडा वेळ बोलावयाचें आहे. (तेजास्विनीस) तेजस्विनी, आपला कंदर्पमहाराजांवर फारच राग दिसतो.

**तेज०:**—देशद्रोही चांडाळाचा कोणालाही संतापच येणार !

**युव०:**—आमचा स्नेह म्हणजे तुम्ही देशद्रोह समजतां काय ?

**तेज०:**—माझ्या देशाच्या दुस्मानांचा स्नेह म्हणजे देशद्रोहच समजत्यें मी.

**युव०:**—पण तुम्ही आम्हाला आपल्या देशाचे दुस्मान लेखतां हीच मुळीं तुमची चूक आहे. आम्ही तुमच्या देशाचे दोस्त आहोंत.

**तेज०:**—माझ्या देशाच्या मानेभोंवतीं गुलामगिरीचा पाश आवळणारे मांग माझ्या देशाचे दोस्त होऊंच शकत नाहींत.

**युव०:**—प्रेमाच्या पाशाला गुलामगिरीचा पाश मानणें म्हणजे मूढपणाची कमाल आहे !

**तेज०:**—लांडग्याच्या मनांत कोंकरासंबंधानें प्रेम आहे असें सांगणें म्हणजे द्वाडपणाची कमाल आहे !

**युव०:**—आमच्या प्रेमाची साक्ष आम्ही आपल्याला कशी पटवावी ?

**तेज०:**—आल्या वाटेनें तडक घरचा रस्ता धरून पटवावी.

**सौदा०**—कदंबाचें राज्य परत कदंबाधिपतींच्या स्वाधीन केल्यावर युवराज घरचा रस्ता धरणारच आहेत.

**तेज०:**—पण आधीं राज्य घेऊन तें फिरून परत करण्याचा द्राविडी प्राणायाम करीत बसण्यापेक्षां मुळीं प्रथम तें घेण्याचीच यातायात सोडून दिलेली बरी नव्हे का ? कदंबाच्या राज्यलक्ष्मीच्या पदराला मातंगांच्या पुण्यहस्ताचा पावन स्पर्श झाला नाहीं तर कादंबांचे पितर कांहीं स्वर्गांतून नरकांत गडगडून पडत नाहींत !

**युव०:**--पण कबंदेश्वरांनीं आपलें राज्य आपण होऊन आमच्या गळ्यांत बांधल्यावर तें त्यांचें त्यांस परत केल्यावांचून आम्ही येथून हालणार कसे ?

**तेज०:**—कदंबेश्वरांनीं आपल्या घरीं येऊन कांहीं आपल्या गळ्यांत आपलें राज्य अडकविलेलें नाहीं. कदंबेश्वरांचें राज्य घशांत टाकण्यासाठीं आपणच कदंबेश्वरांच्या घरावर दरवडा घातला आहे.

**युव०:**—आम्ही कदंबावर स्वारी केली ती कदंबेश्वरांचें राज्य हिरावून घेण्यासाठीं मुळींच केली नाहीं. त्यांचा स्नेह संपादन करण्यासाठीं केली.

**तेज०:**—स्नेह संपादन करण्यासाठीं स्वाऱ्या करण्याची ही शक्कल नवीनच आहे.

**युव०:**—मुळींच नाहीं. परस्परांशीं शत्रुत्वानें वागणाऱ्या दोन पक्षांमध्यें बलाची समानता प्रस्थापित झाल्यावांचून त्यांच्या ठिकाणीं परस्परांविषयीं आदर व प्रेम उत्पन्न होऊं शकत नाहीं हा सनातन सिद्धान्त आहे—

**२२ पद**-पूर्वी-त्रिताल. " चलोरे भाई अवलिया०-"

**प्रबळ अवमानी । दीन अबला ॥ जनिं सदा मान यश बला ॥ ध्रु० ॥ दुर्बलता अति घोर पतनकर । मलिन पाप; करि सदा विनाशा ॥ आत्मवशता कधीं न हीनबला ॥ १ ॥**

मातंगांची आजवर अशीच दुर्दशा झाली होती. परंतु आज आम्ही मातंग कादंबांच्या बरोबरीचेच नव्हे तर कांकणभर अधिकच सरस ठरल्यामुळें कदंबेश्वरांच्या पुढें मान वांकवून उभे न राहातां त्यांच्या मांडीशीं मांडी लावून बसलों आहोंत आणि मित्र या नात्यानें त्यांच्याशीं प्रेमाच्या गप्पागोष्टी बोलत आहोंत.

**तेज०**:—कादंबांचा राजा भ्याड निघाला म्हणून मातंगांना आज आपल्या बलाची मोठ्या दिमाखानें प्रौढी मिरविण्यास जागा झाली आहे. नाहीं तर प्रीतीचें उगमस्थान तारवारीच्या धारेंत आहे का अंतःकरणाच्या पावित्र्यांत आहे याचा निर्णय कादंबांनीं आपणांस समरांगणावर निर्विवाद लावून दाखविला असता. कदंब हें मेंढरांचें राष्ट्र नाहीं–सिंहांचें राष्ट्र आहे व शत्रूच्या पाशवी बलापुढें नम्र होऊन आपल्या प्रीतीचा ठेवा त्याच्या स्वाधीन करण्याचा त्याचा देहस्वभाव नाहीं. तो नमेल–दबेल–किंबहुना अशा दैन्यावस्थेंत मुकाट्यानें मरेलही. परंतु बलात्करानें आपलें अंतःकरण हिरावूं पहाणाऱ्या आपल्या दगलबाज दुस्मानावर प्रेम कधींही करणार नाहीं. युवराज–

२३ पद–गझल. "दिल् चुराये हुए०–"

**जिंकितें । जगिं तें ॥ मृदु प्रेमबलचि प्रेमातें ॥**
**पशुबलें । अवघीं ॥ बलहीन जय न ये त्यातें ॥ ध्रु० ॥**
**छेदितां । प्रेमलता ॥ क्रूर कठिण खड्गानें ॥**
**पाप तें । प्रसवी ॥ घनघोर कलह–कालातें ॥**

**युव०**:—आपला उज्ज्वल स्वदेशाभिमान पाहून व निस्सीम स्वातंत्र्यप्रेम पाहून आपल्यासंबंधानें आमच्या मनांत उद्भवलेला आदर दशगुणित झाला आहे.

**सौदा०**:—आपण गौरवानें बोलत असतां 'दगलबाज' 'दरवडेखोर' अशा शेलक्या विशेषणांनीं आपल्याला आळविणाऱ्या बेमुर्वतखोर उर्मट बायकोसंबंधानें आदर बाळगणें व तो तिच्यासमोर उघड बोलून दाखविणें हें राजकारणी पुरुषांना शोभत नाहीं.

**युव०**:—बाईसाहेब, राजकारणाचे धडे आपल्यापासून शिकण्याइतके कांहीं आम्ही अजागळ नाहीं.

**सौदा०**:—माझ्या प्रत्येक शब्दाचा युवराज भलताच अर्थ करीत आहेत हें पाहून माझ्या मनाला अत्यंत दु:ख होत आहे. मी बोलल्यें तें युवराजांना राजकारणाचे पाठ शिकविण्याच्या उद्देशानें बोलल्यें नाहीं. युवराजांच्या फाजिल स्तुतिपाठानें ही चढेल बायको अधिकच चढून जाईल म्हणून मी युवराजांना इषारा दिला.

**तेज०**:–बाईसाहेब, या बाबतींत आपण अगदीं निर्धास्त असा. कावेबाज शत्रूचे शब्द कोणत्या प्रसंगीं कोणत्या मतलबानें उच्चारलेले असतात हें जाणण्याइतकी अक्कल देवानें मला दिलेली आहे.युरवाजांच्या अखंड स्तुतिपाठानेंही या तेजस्विनीच्या अंगावर मूठभर तर राहोच पण चिमूटभर देखील मांस चढणार नाहीं ही आपण खात्री ठेवा.

**शृगाल**:—म्हणजे युवराज आतांपर्यंत जें बोलले तें सारें खोटेंच होतें म्हणावयाचें !

**तेज०**:—निदान मी तरीं तें सारें खोटेंच समजतें एवढें खरें !

**युव०**:—ठीक आहे. ही आपली पहिलीच मुलाखत आहे, तेव्हां पूर्वग्रहांनीं पछाडलेल्या आपल्या मनाला आमच्या शब्दांत कपटाचा भास झाल्यास त्यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. आम्ही आपल्या ठिकाणीं असतों तर आम्हीही असेंच सावधपणाचें वर्तन केलें असतें.

**सौदा०**:—काय आपल्याशीं प्रेमळपणानें वागणाऱ्या मित्राशीं आपणही असेंच उद्धटपणाचें वर्तन केलें असतें ?

**युव०**:—अलबत्. असेंच वर्तन केलें असतें. शब्दांतील प्रेमळपणा कृतींत अनुभवास येईपर्यंत कट्टया शत्रूनें आणलेल्या मित्रत्वाच्या आवाला आम्ही असाच सडेतोडपणाचा खडखडीत जबाब दिला असता.

**तेज०**:—मला वाटतें आतां आपलें संभाषण अधिक लांबविण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**युव०**:—अर्थ आहे म्हटला तर आहे–आणि नाहीं म्हटला तर नाहीं. आमच्याविरुद्ध का होईना पण आपला अष्टौप्रहर जरी आमच्याशीं बोलत बसलांत तरी आम्हांला आपल्या बोलण्याचा मुळींच कंटाळा येणार नाहीं. कठोर शब्दांच्या आड आपलें कोमल व उदार अंत:करण छपवून ठेवण्याचा

आपण आतांपर्यंत जरी अटोकाट यत्न केलांत तरी आमच्या भेदक दृष्टीनें त्याचा बरोबर ठाव काढलेला आहे व त्यामुळें आपल्या कटु शब्दांतही आम्हांला एकप्रकारची विलक्षण गोडी वाटूं लागली आहे. तथापि आपणांला आमच्याशीं बोलण्याचा कंटाळा आला असेल तर निष्कारण आपणाला येथें डांबून ठेवण्याची आमची इच्छा नाहीं. आम्हाला आपलें अंतःकरण शोधावयाचें होतें आणि तें आतां आम्हीं पुरें शोधलें आहे. आतां आमचें तूर्त तरी आपल्याशीं कांहीं काम उरलें नाहीं. ( कंदर्पास ) कंदर्प, आमचें काम झालें. आपण यांच्या ठिकाणीं यांना आतां पोहोंचतें करूं शकतां.

**कंदर्पः**—ठीक आहे. कालकूट, इला इच्या ठिकाणीं चांगल्या बंदोबस्तानें नेऊन पोहोंचवा. ( तेजस्विनीस ) तेजस्विनी, तुझ्याशीं बोलण्याची माझी इच्छा नाहीं. पण जातां जातां तुझ्याशीं मी एवढें बोलून ठेवतों कीं, आपल्या दुराग्रही स्वभावानें तूं आज एका फार थोर पुरुषाचें मन निष्कारण दुखविलें आहेस.

**तेज०ः**—खरोखरच एका थोर पुरुषाचें मन दुखविल्याचें पाप माझ्या हातून घडलें असेल तर त्याचें प्रायश्चित्त मला केव्हांना केव्हां तरी भोगावेंच लागेल आणि मी तें आनंदानें भोगीनही. परंतु हें पाप माझ्या हातून घडलें आहे असें माझी मनोदेवता मला सांगत नाहीं. महाराज, कपटानें घशांत टाकलेलें राज्य बिनबोभाट पचवितां यावें म्हणून युवराजाकडून हा सारा देखावा दाखविण्यांत येत आहे. उद्यां यांचा डाव पुरा साधला म्हणजे दाखवयाचें दांत आंत ओढले जाऊन चावावयाचे दांत बाहेर आल्यावांचून रहाणार नाहींत. कंदर्प महाराज! यांच्या मिठास मायावी भाषणांनीं हुरळून गेल्यामुळें माझे शब्द या वेळीं आपणास रुचावयाचे नाहींत. परंतु मी आपणास पुनः एकवार बजावून सांगतें कीं–' थांबा–पुढें पाऊल टाकूं नका. अजून तरी मागें फिरा. अजून आपणास आपल्या बचावाचा मार्ग खुला आहे'—

**कंदर्पः**—बस्. पुरें कर आपलें पांडित्य. त्याच त्याच कोट्या व त्याच त्याच शिव्या ऐकण्याचा मला आतां अगदीं कंटाळा आला आहे. मी कदंबाचा राजा आहे–कदंबाचा स्वामी आहें व आपल्या जन्मसिद्ध अधिकारांत मी जें कांहीं केलें आहे तें प्राण गेले तरी मला आतां फिरवावयाचें नाहीं.

**तेज०**—ठीक आहे. आपले हे शब्द परिणामीं आपणांस भोंवल्यावांचून रहावयाचें नाहींत. आपण ही आपल्या राष्ट्राची वंचना केली आहे व तिच्याबद्दल एक दिवस आपल्याला राज्यासह प्राणाचें मोल द्यावें लागेल.आपल्या राजेपणाचें बल त्या वेळीं आपणांस उपयोगी पडणार नाहीं.—

२४ पद—" पीहू पीहू पीहू काहे बोल०"—

**कांहीं नाहीं पाही जनिं मोल । बोल विफल हे ॥ अधम गति परिणामीं ॥ ध्रु० ॥ जनकोपाल-प्रखर-ज्वाला ॥ त्वरित जाळिते स्वकुलवंचका ॥ १ ॥**

चला, मला घेऊन चला. ( काल० हाला० तिला नेतात ).

**युव०**:—वाहवा! नांवाप्रमाणें खरोखरच तेजास्विनी आहे. अशी स्त्री जर मातंगांत जन्मास आली असती तर मातंगानें तिला आपल्या शिरावर धारण केलें असतें!

**सौदा०**:—आणि आतां तरी शिरावर धारण करावयाला हरकत कोणती आहे? जन्मस्थानाच्या फरकामुळें कांहीं तिच्या सद्गुणांत फरक पडलेला नाहीं!

**युव०**:—बाईसाहेब, आपल्या नागमोडी अंतःकरणाला आमचे सरळ उद्गार पटावयाचे नाहींत हें आम्ही जाणून आहोंत.

**सौदा०**:—माझें अंतःकरण नागमोडी आणि आपले उद्गार सरळ काय? युवराज, आपले शब्द माझ्या अंतःकरणाला घरें पाडीत आहेत.

**युव०**:—बाईसाहेबांनीं जरा शांत व्हावें. तेजस्विनीची स्तुति म्हणजे कांहीं आपली निंदा नाहीं.

**सौदा०**:—निंदा नाहीं कशी? निंदाच आहे. माझ्या हाडवैरिणीसमोर आज आपण माझी मरणप्राय अप्रतिष्ठा केली आहे.

**युव०**:—बाईसाहेबांची त्याबद्दल आम्ही माफी मागतों. बाईसाहेबांनीं आमच्या दुस्माननीसमोर आम्हाला शहाणपणा शिकविण्याचा आव आणला नसता तर असा प्रसंग खात्रीनें आला नसता. असो. झालें तें झालें. आतां पुढें तरी बाईसाहेब अधिक अक्कलहुषारीनें वागतील अशी आम्हाला उमेद आहे. ( कंदर्पास ) कंदर्प, चला आपण अंमळ बागेंत फिरून येऊं.

**कंदर्पः**—चलावें. आमची तयारी आहे. सौदामिनी, चल.

**युव०**:— त्यांना कशाला उगाच तकलीफ देतां ? आमच्या बोलण्यानें त्यांचे पित्त भडकून गेलें आहे. सेव्हां तें शांत करण्यासाठीं त्यांना थोडा एकांत मिळूं द्या.

**कंदर्पः**—पित्त कसलें भडकलें आहे ? तिचा स्वभाव थोडा गरम आहे एवढेंच. आपण पुनः दोन गोड शब्द बोललांत म्हणजे येईल प्रकरण ताळ्यावर.

**युव०**:—गोड शब्द बोलण्याला आमची मुळींच ना नाहीं. पण आम्हाला आपल्या एकट्याशींच कांहीं बोलावयाचें आहे.

**कंदर्प०**:—पण सौदामिनी आणि आम्ही दोन कोठें आहोंत ? आमचे देह दोन आहेत–पण आत्मा एकच आहे.

**युव०**:—आत्म्यासंबंधानेंच बोलावयाचें असेल तर तो दोघांचाच का, सर्वांचाच आत्मा एक आहे. पण मला आपल्याशीं कांहीं आत्मज्ञानाच्या गोष्टी बोलावयाच्या नाहींत.–व्यवहार बोलावयाचा आहे.

**सौदा०**:—महाराजांनीं जावें त्यांच्याबरोबर. माझी प्रकृति बरी नाहीं. तेव्हां मी कांहीं येत नाहीं.

**युव०**:—झालें ? आतां कांहीं हरकत नाहींना ? परवानगी मिळाली.

**कंदर्पः**—ठीक आहे. चलावें युवराजांनीं.

**युव०**:—शृगाल, चला. तुम्हीही बरोबर चला.

**सौदा०**:—आपल्या दोघांच्या एकांतांत माझी अडचण होते आणि शृगालराज चालतात कां ?

**युव०**:—आम्हाला वाटतें या सवालाचा जबाब शब्दांनीं देण्यापेक्षां कृतीनेंच दिलेला बरा. कंदर्प–शृगाल–चला. ( तिघे जातात ).

**सौदा०**:—( स्वगत ) बेमान–गळेकापू–चोर कोठला ! गरज सरतांच वैद्याला तिरडीवर आवळावयाला तयार ! कंदर्पाची गट्टी जमली नव्हती तोंवर माझी सारखी वरवर चालली होती–पण आतां कंदर्प पुरा तावडींत आलेला पहातांच माझ्यावर सर्पासारखा उलटूं पाहतो. जेथें तेथें अपमान–जेव्हां तेव्हां अप्रतिष्ठा ! तेजस्विनीचा गौरव आणि माझा उपहास ! ठीक आहे. पाहून घेते. कंदर्प मुठींत आला तरी कदंबाचें सिंहासन कांहीं अजून पदरांत पडलेलें नाहीं. तुझ्या जिभेंत अमृत भरलेलें असेल तर माझ्या जिभेंतही कालकूट

भरलेलें आहे. दोन दिवसांच्या आंत माझ्या विषारी दांतांच्या दंशानें कंदर्पाला तुझ्यावर उलटविला नाहीं तर नांवाची सौदामिनीच नाहीं. (विचार करून) बस्. ठरला निश्चय. आतां एकदम उद्योगालाच लागावयाचें.

२५ पद-"पतितं दीनोद्धरणं०—"

**शठ हा । गर्वोद्धट हा ॥ भेदितो दुरुत्तरें मदंतरा ॥**
**शठ हा ॥ ध्रु० ॥ कुटिल कपटि रिपु मातला ॥ पाहिजेचि**
**पदिं झणि ठेंचिला ॥ वाया । माया । खला या ॥ १ ॥**

(त्वेषानें निघून जाते.)

---

## प्रवेश दुसरा.

(स्थळः—राजवाड्याच्या बागेंतील एक भाग. शृगाल व पशुपाल बोलत येतात)

**शृगालः**—असें काय ? कंदर्प महाराज आमच्याशीं अलिकडे एक दोन दिवसांत असें तिरसटपणानें फटकून वागतात त्याचें कारण सौदामिनी राणीसाहेब आहेत एकूण.

**पशु०ः**—भोलेनाथ! सौदामिनी राणीसाहेबच आहेत. दुसरे कोणी नाहीं. अहो, आगेच्या डोंबाला विस्तवाची ठिणगीच कारण होत असते.-पाण्याचे थेंब कारण होत नाहींत. अहो, ही म्हणजे अगदीं उलट्या काळजाची महापाताळयंत्री बायको आहे. बोलेल एक-दाखवील दुसरेंच-आणि करील तिसरेंच. भोलेनाथ!

**शृगालः**— बरें पण हें गुपित तुम्हाला कसें कळलें ?

**पशु०ः**—आम्हाला कसें कळलें! अहो, आमचे कान आखूड का आहेत ? पाताळांत बसलों तर स्वर्गांतल्या गोष्टी ऐकतों आम्ही. मग हें तर काय आमच्या परसांतलेंच कारस्थान. हें कळावयास काय कठिण ? नुस्ता नाकानें वास घेऊन कान टवकारावयाचा उशीर कीं खडान् खडा-शब्दान्-शब्द-नव्हे-अक्षरान् अक्षर-भोलेनाथ!

**शृगालः**—पण सौदामिनी राणीसाहेबांना आमचा एवढा राग येण्याचें कारण काय ?

**पशु०:**—कारण भोलेनाथ ! बायकांना लोण्याची सुद्धां सवत खपत नाहीं, मग तेजस्विनीसारखी हाडामांसाची कोठून खपणार ? अहो, "याचको याचकं दृष्ट्वा श्वानवत् गुर्गुरायते" समजलांत भोलेनाथ !

**शृगालः**—पण युवराजांचें तेजस्विनीवर प्रेम आहे कोठें ?

**पशु०:**—अहो, पुरुषांच्या भावड्या नजरेला चोरट्या प्रेमाची बदचाल चटकन् उमगत नाहीं. पण बायकांची नजर या बाबतींत महाबिलंदर असते. आणि त्यांतही ही सौदामिनी म्हणजे तर या कामात अगदीं भोलेनाथ ! नसेल तेथें चोरी पकडील-मग असेल तेथें तर गोष्टच बोलावयाला नको. नुसत्या सुतानें स्वर्गाचा पल्ला गांठते. माझ्या उभ्या जन्मांत इच्यासारखी जहाबाज बायको मीं कांहीं कधीं-भोलेनाथ !

**शृगालः**—बरें. मी म्हणतों युवराजांचें तेजस्विनीवर प्रेम असलें तर त्यांत इचें काय बिघडलें !

**पशु०:**—अहो सारेंच बिघडलें ! कंदर्प महाराजांचें राज्य गेल्यामुळें कदंबानें राज्ञीपद नाहीं आणि युवराजांची शिकार निसटल्यामुळें मातंगाचें युवराज्ञीपदही नाहीं. तेलही गेलें-तूपही गेलें आणि हातीं धुपाटणें मात्र आलें. भोलेनाथ !

**शृगालः**—पण कंदर्प महाराजांचें राज्य आम्ही त्यांना परत करणार आहोंत.

**पशु०:**—अहो, आपण नेहमींच असें म्हणता. पण भामट्यांचा विश्वास कधीं कोणाला-भोलेनाथ !

**शृगालः**—म्हणजे ? आम्ही भामटे आहोंत वाटतें ?

**पशु०:**—अहो आपण भामटे आहांत असें मी म्हणत नाहीं. पण सौदामिनीनें महाराजांच्या कानांत हाच मंत्र सांगितला आहे, त्याला काय करावयाचें ? ती स्वतः अट्टल भामटी असल्यामुळें तिच्या भामट्या नजरेला आपल्यासारखे भामटे तेव्हांच-भोलेनाथ !

**शृगाल:**—(विचारपूर्वक) छे—युवराजांना सांगून हें प्रकरण मिटतें घेतलें पाहिजे. नाहींतर भलताच परिणाम व्हावयाचा.

**पशु०:**—अहो भलताच काय—भयंकर परिणाम व्हावयाचा! आज सकाळपासून तर महाराजांची तब्येत फारच उखडलेली दिसते. खुद्द राणी-साहेब आणि प्रधानजी यांच्यावर सुद्धा शिव्यांचा सारखा भडिमार सुरूं आहे, भोलेनाथ!

**शृगाल:**—म्हणजे? राणीसाहेबांनीच चिडविलें आणि राणीसाहेबांनाच शिव्या?

**पशु०:**—हां. हीच तर सारी—भोलेनाथ! युवराजांच्या पाठीस लागण्या-साठीं सैतान जागा केला आणि आतां त्यानें मान्त्रिकांचीच मानगुटी धरली आहे. तहाच्या शर्ती पाळीत नाहीं म्हणतो, भोलेनाथ!

**शृगाल:**—काय? तहाच्या शर्ती पाळीत नाही म्हणतो?

**पशु०:**—हो मी प्रत्यक्ष आपल्या कानांनी हें—भोलनाथ! हां.

**शृगाल:**—(विचार करून) युवराजांच्याजवळ तुम्ही या सर्व गोष्टी कबुल कराल का?

**पशु०:**—भोलेनाथ! खऱ्याला डर कसला! पण हें पहा, युवराजांच्या पुढें तुम्ही एवढ्यांतच मला पेश करूं नका. मी भितों असें नाहीं. पण तुमच्या युवराजांना पाहिले म्हणजे माझ्या छातींत—जरा भोलेनाथ! तेव्हां थोडी भीड चेपूं द्या. मग युवराज आहेत आणि मी आहे. पाहून घेतों. एका शब्दांत युवराजांना चारीमुंडे चित मारलें नाहीं तर काय म्हणाला तें—भोलेनाथ!

(शिशुपाल गडबडीनें प्रवेश करतो).

**शिशु०:**—ए भोलेनाथ, येथें यांच्याशीं गप्पा काय छाटीत बसला आहेस? तिकडे चल. महाराज तुझ्या नांवानें सारखा शंख करीत आहेत.

**पशु०:**—माझ्या नांवानें शंख करीत आहेत! म्हणजे? मी काय बोवा त्यांचें घोडें—भोलेनाथ?

**शिशु०:**—तूं घोडें मारलें नाहींस. पण शंख मात्र तुझ्या नांवानें चालला आहे खरा.

**पशु०:**—वा: हें खूप आहे बोवा! डंख मारावा दुसऱ्यानें आणि शंख माझ्या नांवानें! वड्याचें तेल वांग्यावर! भोलेनाथ!

**शिशु०:**—तेव्हां चल. उगाच बडबड करीत बसूं नकोस. तुझें तोंड दिसल्यावांचून दारूच्या बाटल्यांचीं तोंडें खुलीं व्हावयाचीं नाहींत.

**पशु०:**—असें ? मदिरापानाच्या समारंभाकरितां या पशुपालाचें आवाहन चाललें आहे काय ? मग भोलेनाथ ! चल–दोन सोडून चार पायांवर आपली तयारी. पण तूं खरें सांगतोस ना हें ? का कांहीं लबाडी आहे ? नाहीं तर दारू प्यावयाला म्हणून जाइन आणि लाथा खाऊन परत येईन. हो–महाराजांची तब्येत जरा गरम झाली आहे म्हणून–भोलेनाथ !

**शिशु०:**—अरे गरम झालेली तब्येत नरम करण्याकरतांच तर हा तीर्थप्राशनाचा समारंभ आहे. मदिरा ही खादिरांगारांची वडील बहीण. एक चटका बसला कीं प्रपंचांतील सारा तापत्रय जळून खाक. तेंव्हां चल. दारूच्या पवित्र गंगाप्रवाहांत चार दोन बुचकळ्या देऊन महाराजांचा ताप निवारण करूं.

**पशु०:**—ठीक आहे. चल ( शृगालास ) वकीलसाहेब, भोलेनाथ !

**शृगाल**–ठीक आहे. हा तीर्थप्राशनसमारंभ आटोपल्यावर पुनः एकदां भेटा म्हणजे तुम्हां उभयतांच्या कामगिरीसंबंधानें आपण सविस्तरपणें बोलूं.

**पशु०:**–समारंभ संपतांच येतां येईल कीं नाहीं सांगवत नाहीं, पण दारूची निशा उतरून फिरून शुद्धीवर आलों म्हणजे जरूर येऊन भेटेन. बरें, भोलेनाथ !

**शृगालः**—भोलेनाथ ! ( जातो. )

**शिशुः**—कायरे, जुळलें का कांहीं संधान ?

**पशु०:**—अरे–भोलेनाथ ! थोरामोठ्यांची चुगली म्हणजे केव्हांही सही होणारें शिफारसपत्र आहे म्हणून समज. भोलेनाथ !

**शिशु०:**—म्हणजे ? तूं चुगली केलीस कीं काय ?

**पशु०:**—भोलेनाथ ! चुगली नाहीं तर जिभलीची बहादुरी काय ?

**शिशु०:**—कोणाची चुगली केलीस ?

**पशु०:**—अरे खुद्द राजेसाहेबांची आणि राणीसाहेबांची ! भोलेनाथ ! शिकारच करावयाची मग उंदीरघुशींची का ? चांगले वाघ लांडगेच पालथे घातले पाहिजेत. त्या सौदामिनीनें–सोदीनें मातंगेश्वराकडून मिळालेला लुचपतीचा सारा मलिदा स्वतःच सफाचट करून टाकला. तुझ्या माझ्या हाता

एक कपर्दिकाही लागूं दिली नाही. तेव्हां आता तिला पुरी भोलेनाथ करून टाकण्याची मी अगदीं भीष्मप्रतिज्ञा केली आहे. बस्. एक ती तरी भोलेनाथ नाहींतर मी तरी भोलेनाथ ! जें होईल तें जाईल. ( पाहून ) पण थांब, तो लष्करी डुक्कर इकडे येत आहे. तेव्हां आता जरा हा कथाप्रसंग–भोलेनाथ ! ( हालाहल येतो ).

**हाला०**:––( शिशुपालास ) कायरे ए कुक्कुट,इकडे काय करतो आहेस ?

**शिशु०**:––कांही नाही. पशुपालाला बोलावतो आहे.

**हाला०**:––आणि तूं रे मर्कट ?

**पशु०**:––मी शिशुपालाचें बोलावणें ऐकतो आहे.

**हाला०**:––ऐकतो आहे ? बोलावणें नुसतें ऐकून चालत नाही. तावडतोब पाय उचलून वाट चालूं लागलें पाहिजे.

**पशु०**:––त्याच विचारांत आहोंत आम्ही.सेनापतीसाहेबाची लष्करी शिस्त मार्गांत आडवी आली म्हणून जरा अडखळलों. म्हटलें एवढ्या मोठ्या प्रचंड धोंडेला असें उद्धटासारखें ओलांडून जाणें प्रशस्त नाहीं आणि शिवाय लष्करी शिस्तीला धरूनही नाही. भोलेनाथ !

**हाला०**:––लष्करी शिस्तीला तुम्ही एवढा मान देऊं लागलांत हें पाहून मला मोठा आनंद होतो. पण आतां येथें क्षणभरही थाबूं नका.महाराज रतिविलासमंदिरांत तुमची अगदी चातकाप्रमाणें वाट पहात बसले आहेत.

**शिशु०**:––हे आम्ही निघालोंच तिकडे. सेनापतींचा विजय असो !

**पशु०**:––लष्करीशिस्तीचा जयजयकार असो ! भोलेनाथ ! ( दोघे निघून जातात.)

**हाला०**:––( स्वगत ) आतां युवराजांची भेट घेऊन हें पत्र त्यांच्या स्वाधीन केलें पाहिजे. पण तें आतां सांपडतील कोठें ? ( पाहून ) अरे वाः, ते पहा शृगाल आणि युवराज इकडेच येत आहेत. बेश झालें. आपली पायपीट चुकली.

( शृगाल व युवराज बोलत प्रवेश करतात.)

**युव०**:––( शृगालास ) एकुण आमच्या अंदाजाप्रमाणें आमचा डाव सही झाला !

**शृगालः**—निःसंशय झाला ! आपण चिडविल्यामुळें क्रोधानें खवळून जाऊन त्या जलाल नागिणीनें कंदर्पाच्या कानाला आपल्या विषारी दातांचा कडकडून चावा घेतला.

**युव०ः**—फार छान झालें. आतां आपला जम येथें पुरा बसला आहे. तेव्हा आतां त्यानें तहाच्या शर्ती पाळण्याची टाळाटाळ केली कीं राज्य खालसा करून आपण मोकळें होऊं. उगाच भिजत घोंगडें ठेवण्यांत अर्थ काय ? ( हालाहल पुढें येतो. )

**हाला०ः**—( मुजरा करून ) युवराजांचा विजय असो !

**शृगालः**—काय ? लष्करी शिस्तीचे आधारस्तंभ, इकडे कोणीकडे मोर्चा वळला आपला ?

**हाला०ः**—महाराजांनीं युवराजांना देण्याकरितां हें पत्र दिलें आहे.

**शृगालः**—पाहूं–द्या तें इकडे.

**हाला०**—माफ करा. तें पत्र युवराजांचें आहे. आपलें नाहीं. मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. एकाचें पत्र दुसऱ्याला आणि दुसऱ्याचा निरोप तिसऱ्याला सांगण्याचा माझा शिरस्ता नाहीं.

**शृगालः**—ठीक आहे. युवराजांना द्या.

**हालाः०**—युवराजांनीं या पत्राचा स्वीकार करावा. (युव० स पत्र देतो.)

**युव०**—( पत्र घेऊन व वाचून ) तुमचे महाराज या वेळीं कोठें आहेत ?

**हाला०ः**—यावेळीं ते कोठें आहेत तें मी कसें सांगणार ? मी पत्र घेऊन इकडे आलों त्या वेळीं ते रतिविलासमंदिरांत होते. पण आतां ते तेथेंच आहेत का दुसरीकडे निघून गेले आहेत हें मला काय माहित ? राजे लोकांच्या पायाला नेहमीं भोंवरा बांधलेला असतो, म्हणून शंका येते. मी लष्करी शिस्तीचा माणूस–

**युव०ः**—समजलें–समजलें. जास्त चऱ्हाट वळूं नका. असेच परत जाऊन पत्र आम्हांला पोहोंचलें असें महाराजांना कळवा. आणि त्याचप्रमाणें सौदामिनी बाईसाहेबांना–

**हाला०ः**—सौदामिनी राणीसाहेबांना ?–

**युव०:**—राणीसाहेबांना नाहीं-बाईसाहेबांना ताबडतोब आमच्या भेटीला लावून द्या. जा.

**हाला०:**—जशी युवराजांची आज्ञा. मी लष्करी शिस्तीचा—

**युव०:**—हां-आणखी हें तुमचें लष्करी शिस्तीचें पालुपद आमच्यापुढें वारंवार गात जाऊं नका. तुम्ही लष्करी शिस्तीचे माणूस आहांत हें आम्हांला माहीत आहे.

**हाला०:**—सरकारांची मर्जी. सरकारांचा विजय असो. ( जातो. )

**युव०:**—शृगाल, काम फत्ते! हें पत्र पहा. ( पत्र त्यास देतो. )

**शृगाल०:**—( पत्र वाचून ) वाः छान डाव रंगाला आला. आतां तो खात्रीनें भडकणार कांहीं तरी घोंटाळा करणार-आणि तह मोडल्याचें निमित्त करून कदंबदेश बिनबोभाट आपल्या घशाखालीं घालतां येणार !

**युव०:**— आलाच पाहिजे. तेवढ्यासाठींच तर हा सौदामिनीला चिडविण्याचा सारा व्यूह आम्हांला रचावा लागला.

**शृगाल०:**—मला वाटतें आपण आतां सौदामिनीला थोडें गोंजारण्याला सुरवात करावी.

**युव०:**—छे-इतक्यांत नाहीं. राज्यदानाच्या शर्तीचा एकदांचा सोक्षमोक्ष होईपर्यंत आपण ही नागीण नेहमीं अशी खवळलेलीच ठेवली पाहिजे; नाहींतर ती या भडकलेल्या सैतानाला पुनः शांत करील व त्याच्याकडून तहांतील शर्ती बिनतक्रार पाळवून त्याचें राज्य त्याला परत करण्याला आपणाला भाग पाडील. तेव्हां या वेळीं तिला आपण सारखें डवचीतच राहिलें पाहिजे. कदंबाचें राज्य कोणत्याही हालतींत आम्हांला परत द्यावयाचें नाहीं आणि ही सौदामिनीची ब्यादही आम्हास कायमची पाठीस लावून घ्यावयाची नाहीं. कंदर्पानें शर्त मोडली कीं राज्य घशाखालीं आणि सौदामिनी फांसावर. बस्. खेळ खलास !

**शृगालः**—सौदामिनीला दिलेलें युवराज्ञीपदाचें वचनही आपल्या मनांत पाळावयाचें नाहीं ?

**युव०:**—बिलकुल नाहीं. असल्या छिनाल रांडेला मातंगयुवराजाच्या अर्ध्यासनावर बसण्याचा मान आमच्याकडून केव्हांही मिळणार नाहीं.

शृगालः—युवराजांचें मन तेजस्विनीनें आकर्षण केलेलें दिसतें.

युव०:—तसेंच कांहीं केवळ नाहीं. परंतु तिला जिंकल्यावांचून आमचा खरा विजय झाला असें मनाला वाटत नाहीं. ही कंदर्पादि मंडळी म्हणजे केवळ एक मेंढरांचा कळप आहे. त्यांना जिंकण्यांत कांहीं खरा पुरुषार्थ नाहीं. खरा पुरुषार्थ या वाघिणीला वेंसण घालण्यांत आहे.

शृगालः—पण ही वाघीण आपल्या जाळ्यांत सांपडेल असें मला वाटत नाहीं.

युव०:—जाळ्यांत सांपडली नाहीं तर फांसावर चढेल. आम्हांला कांहीं त्या गोष्टीची मोठीशी फिकीर वाटत नाहीं. ( सौदा० येते. )

सौदा०:—युवराजांनीं मला कशाला बोलाविलें ?

युव०:—हें कंदर्पमहाराजाकडून आलेलें पत्र पहाः-(पत्र पुढें करतो )

सौदा०:—तें मीं पाहिलें आहे. माझ्या समक्षच महाराजांनीं तें लिहिलें.

युव०:—अस्सें. म्हणजे आम्हांला हुलकावण्या देण्यांत कंदर्पमहाराजांना आपणही सामील आहांत म्हणावयाचें.

सौदा०: —समक्ष घडणाऱ्या प्रत्येक गोष्टींत मनुष्य सामीलच असतें असें कांहीं शास्त्र नाहीं.

युव०:—अस्सें ! बरें. याला उत्तर काय द्यावयाचें ?

सौदा०:—मी काय सांगूं ! आपल्या मर्जीस येईल तें द्या.

युव०:—राज्यदानसमारंभ आतां एक क्षणभरही लांबणीवर टाकण्याची आमची इच्छा नाहीं. आतांपर्यंत झाला हाच विलंब मर्यादेबाहेर गेला आहे.

सौदा०:—तर मग तसें कळवा महाराजांना.

युव०:—पण आपली या बाबतींत सल्ला काय आहे ?

सौदा०:—माझा कांहींच सल्ला नाहीं. युवराजांना बरें दिसेल तें युवराजांनीं खुशाल करावें.

युव०:—पण तें आपल्या महाराजांना रुचेल का ?

सौदा०:—तें तरी मी काय सांगूं ! कदाचित् रुचेल–कदाचित् रुचणारही नाहीं. पण मी म्हणत्यें, महाराजांच्या रुचण्या न रुचण्याची युवराजांना पर्वा करण्याचें कारण काय ! महाराज जित आहेत आणि आपण

जेते आहांत आणि जितांना त्यांची इच्छा असो वा नसो जेत्यांच्या लहरी-प्रमाणें नाचणें भागच आहे.

**युव०:**—अस्सें! ठीक आहे. तर मग या पत्रांतील विनंति आम्हांला मान्य करतां येत नाहीं असें आपल्या महाराजांना जाऊन कळवा.

**सौदा०:**—कळवितें. पण मला वाटतें युवराजांनीं या बाबतींत पुनः एकवार नीट विचार करावा.

**युव०:**—आपल्याला आम्हीं सल्ला विचारली तेव्हां ती देण्याचा आपण मोठ्या तोऱ्यानें इन्कार केलांत. आतां आम्हांला आपल्या सल्लेची जरूर नाहीं. आमचा निकाल पुरा विचार करूनच आम्हीं दिलेला आहे. आणि तो आपल्या महाराजांकडून बिनतक्रार अमलांत आला पाहिजे अशी आमची आपणाला सक्त ताकीद आहे.

**सौदा०:**—मला ताकीद आहे?

**युव०:**—होय—तुम्हांला—सौदामिनीसाहेबांना—सक्त ताकीद आहे.

**सौदा०:**—हें पत्र मीं पाठविलेलें नाहीं—महाराजांनीं पाठविलेलें आहे.

**युव०:**—तें ठाऊक आहे आम्हांला. राजकारणाचे खेळ आम्ही कांहीं आज नव्यानेंच खेळत नाहीं. असलीं पत्रें कोण सांगतें-कोण लिहितें-आणि कोण पाठवितें हें सारें आम्ही पुरें जाणतों. तेव्हां हें पत्र महाराजांकडून आलें असलें तरी आमची ताकीद—आमची आज्ञा-आमचा हुकूम-अमलांत आणण्याची जबाबदारी सौदामिनीबाईसाहेब, आपल्यावर आहे. आणि तिची चोख तामिली करण्यांत आपल्याकडून थोडाही कसूर झाला तर—बाईसाहेब—

**सौदा०:**—तर काय?

**युव०:**—तर काय हें आम्ही बोलून दाखवूं इच्छित नाहीं—वेळ आली म्हणजे तें प्रत्यक्ष करूनच दाखविलें जाईल. तूर्त एवढा इषारा मिळाला तेवढा बस् आहे. तेव्हां शहाण्या असाल तर जरा बेतानें पुढें पाऊल टाका. शृगाल, चला आपण राजवाड्यांत जाऊं या.

**शृगाल:**—जशी सरकारांची इच्छा. चलावें.—

**सौदा०:**—शृगालराज, मला आपल्याशीं दोन शब्द बोलावयाचे आहेत.

**युव०:**—( मध्येंच ) आपल्याशीं दोन शब्द बोलावयाला शृगालांना या वळीं फुरसत नाहीं. चला शृगाल, चला.–

**शृगालः**—सरकारांनीं पुढे व्हावे. मी आलोंच पाठोपाठ.

**युव०:**—छे–आपण आमच्याबरोबरच आलें पाहिजे. आमच्यासमोर ज्याना आपल्याशीं मोकळेपणानें बोलण्याची इच्छा नाहीं त्यांना आमच्यामागें आपल्याशीं गुप्त खलबतें करण्याची संधि देण्याची आमचीही इच्छा नाही. चला–आमच्या पुढें व्हा.—( दोघे जातात. )

**सौदा०:**—डाव सपशेल उलटला! कंदर्प बिथरलेला पाहून हा कांहीं नरम येईल असें वाटलें होतें. पण आतां परिणाम भलताच होणारसें दिसतें.

२४ **पद**—तिलंग–त्रिताल. "बेचनको मै तो०–"

**कातर न; धीट खल हा। बधेना ॥ सकल डाव मम**
**हाणुनि पाडी। कपट–जालीं कदा फसेना ॥ ध्रु० ॥**
**प्रेमपाश गुण विफलचि ठरला ॥ कार्य-नाश-भय**
**धाक बसविना ॥ १ ॥**

( कालकूट येतो. )

**कालः०**— काय! पहार वाकली का दगड फुटला?

**सौदा०:**—पहार वांकली नाहीं–पण दगडही फुटला नाहीं.

**काल०:**—तर मग मोठाच पेंच येऊन पडला म्हणावयाचा.

**सौदा०:**—पेंच म्हणून काय विचारतां? आतां जर आपण हरप्रयत्नानें कंदर्पाला शांत केला नाही तर आपली कांहीं घडगत नाहीं.

**काल०:**—पण कंदर्प आतां शांत होणार कसा? तो तर अगदीं बेफाम झाला आहे.—

**सौदा०:**—लढाईची दहशत पुनः घालून पहावयाची.—

**काल०:**—मला नाहीं वाटत लढाईच्या दहशतीचा कांहीं उपयोग होईलसे.

**सौदा०:**—नाहीं तर नशीब आपलें. जें व्हावयाचें असेल तें होईल.

**काल०:**—( हळूच ) येथून पाय काढावयाचा असेल तर अजून सवड आहे.

**सौदा०:** —छे-पाय काढण्याचें नांव घेऊं नका. काय सोक्षमोक्ष व्हावयाचा असेल तो येथेंच होऊन जाऊं द्या.

( शिशु० व पशु० येतात. )

**शिशु०:**—सरकार-सरकार चला. महाराजांची तब्येत या वेळीं अगदीं थंड झाली आहे.—

**सौदा०:**—थंड झाली आहे ?

**पशु०:** - भोलेनाथ ! अगदीं थंडगार झाली आहे.

**शिशु०:**—दारूच्या आगेनें रागाची आग आम्हीं अगदीं पार विझवून टाकली आहे.

**पशु०:**—भोलेनाथ ! काट्यानें काटा काढून टाकला आहे !

**शिशु०:** —आतां सरकारांनीं नुसती मलमपट्टी लावली कीं काम सोळा आणे फत्ते.

**पशु०:**—तेव्हां तवा तापला आहे तोंवर सरकारांनीं त्यावर तडाख्यानें आपल्या रोट्या भाजून घ्याव्यात हेंच-भोलेनाथ !

**सौदा०:**—चला, कालकूट, नशिबाची परीक्षा एकदांची पाहून टाकूं.

**शिशु०:**—मी येऊं सरकार ?

**सौदा०:**—नको.

**शिशु०:** – जशी सरकारांची आज्ञा.

**पशु०:**—आणि मी-भोलेनाथ ?

**सौदा०:**—तूंही नको.

**पशु०:**—जसा सरकारांचा हुकूम.

**सौदा०:**—चला.-चला-कालकूट. ( काल० व सौदा० जातात. )

**शिशु०:**—हो. भोलेनाथ-आतां कोणीकडे पल्ला ?

**पशु०:**—आतां शृगालराजांकडे. काशीची गंगा रामेश्वराला आणि रामेश्वराचा सागर काशीला. भोलेनाथ !

**शिशु०:**—आणि शृगालराजाकडे जाऊन करावयाचें काय ?

**पशु०:**—चुगल्या ! दुसरा धंदा कोणता आहे आपल्याला ? भोलेनाथ !

**शिशु०:**—हें पहा तुझा हा धंदा निव्वळ सट्टेबाजी आहे. केव्हां आंगलट येईल याचा कांहीं नेम नाहीं.

**पशु०:**—अं. आला तर आला. नशिबावर जबरदस्ती करूं पहाणाऱ्या मर्दांनीं असें भिऊन नाहीं चालत. अरे, हें जीवित म्हणजेच एक जंगी जुगार आहे. साधली तर दिवाळी नाहींतर–भोलेनाथ !

**शिशु०:**—मला तर बाबा या उपव्व्यापांत होळीचीच भीति वाटते.

**पशु०:**—असा भागुबाईसारखा डरतोस काय मर्दा ? आपल्यासारख्या नंग्या फटिंगांना होळी आणि दिवाळी दोन्ही–भोलेनाथ ! आपल्याला नाहीं आगा–नाहीं पिच्छा. मग एवढी फिकीर हवी कशाला ? साधलें तर काम, नाहीं तर सटक सीताराम ! चल–एकाद्या रणभीरूप्रमाणें ऐनवेळीं असा अवसानघात करूं नकोस. माझ्यावर विश्वास ठेव. "सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज". मी सर्व होळीदिवाळींतून तुला बिनहरकत पार पाडतों. डरूं नकोस–घाबरूं नकोस–आणि कचरूंही पण नकोस. अरे, "हिंमत मर्दा तो मदत खुदा !"–भोलेनाथ.—( त्याला ओढून घेऊन जातो. )

---

## प्रवेश तिसरा.

( कदंब राजसभा. दरबार भरला असतां कंदर्प, सौदा० कालकूट इत्यादि प्रवेश करतात. खडी ताजीम होते. कंदर्प सिंहासनावर बसावयास जातो. परंतु सिंहासनाजवळ जातांच थबकून उभा राहातो. )

**सौदा०:**—हें काय ? महाराज थांबले कां ?

**कंदर्प:**—सौदामिनी, महाराज प्रतापादित्यांच्या या परमपवित्र आणि परमश्रेष्ठ सिंहासनास स्पर्श करण्याची पात्रता माझ्यासारख्या गुलामगिरीस हपापलेल्या नादान नामर्दांच्या अंगीं आहे असें तुला वाटतें का ?

**सौदा०:**—आजच्या प्रसंगीं कांहींही गडबड करवयाची नाहीं असें महाराजांनीं मला वचन दिलेलें आहे.

**कंदर्पः**—वचन दिलें आहे खरें, पण या सिंहासनावर पाऊल ठेवण्यास मला धैर्यच होत नाहीं. त्याच्याकडे नजर फेंकली कीं महाराज प्रतापादित्यांची मूर्ति त्यावर विराजमान झालेली व क्रोधाविष्ट दृष्टीनें माझ्याकडे पहात असलेली मला दिसूं लागते.

**सौदा०:**—एखाद्या धर्मभोळ्या अडाणी अजागळाप्रमाणें कांहीं तरी खुळचट कल्पना डोक्यांत घेणें महाराजांसारख्या सुज्ञास शोभत नाहीं. हं. धरावा माझा हात आणि चढावें वर. आपण सिंहासनावर पाऊल ठेवतांच प्रतापादित्यांची मूर्ति आपल्याला आसन मोकळें करून देतें कीं नाहीं तें मी पहात्ये. ( त्याला हात धरून सिंहासनावर बसवितें ). कालकूट, आतां दरबाराला सुरुवात करा.

**काल०:**—जशी राणीसरकारांची आज्ञा. ( सभेस उद्देशून ) कादंबराजसभेंतील मान्यवर सभासद हो, आजचा खास दरबार कोणत्या कार्यासाठीं भरविण्यांत आला आहे हें आपणां सर्वांस विदितच आहे. कादंब-मातंगांमध्यें नुकत्याच झालेल्या तहान्वयें दिग्विजयी मातंग युवराजांच्या पदरांत कादंब राज्याचें दान कदंबाधिपतीकडून आजच्या दरबारांत टाकण्यांत येणार आहे. तेव्हां कदंबेश्वरांकडून होणाऱ्या या थोर राज्यदानाला आपणां सर्वांची अखेरची संमति कदंबेश्वरांना पाहिजे आहे आणि आपणांकडून ती आनंदानें दिली जाईल असा कदंबेश्वरांना दृढ विश्वास आहे.

**सभा०:**—आमची पूर्ण संमति आहे.—

**कंदर्पः**—( एकदम उभा राहून ) थांबा—कदंब-राजदरबारांतील मान्यवर सभासद हो, थांबा. आजच्या राज्यदानाला आपली अखेरची संमति देण्यापूर्वीं चांगला विचार करा. आजचें हें राज्यदान म्हणजे तुमच्या स्वातंत्र्याचें—तुमच्या सर्वस्वाचें दान आहे. या दानाचें उदक तुम्हीं मातंग युवराजाच्या हातावर एकवार सोडलेंत म्हणजे यावज्जन्म तुम्हांला परक्यांच्या गुलामगिरींत रखडत रडत पडावें लागेल हें लक्षांत ठेवा.

**सौदा०:**—सरकार—सरकार—हें काय ? या वेळीं असें भलतेंच बोलणें चांगलें का ?

**कंदर्पः**—पण यांत वाईट काय आहे ? मी या लोकांचा राजा आहे—

आणि त्यांच्या कृत्याचे परिणाम काय होतील हें त्यांना नीट समजावून देणें हें माझें कर्तव्य आहे.

**सौदा०**:—तें सारें खरें. पण आपलें कर्तव्य बजावीत असतां माणसानें सत्याचा अपलाप करणें युक्त नाहीं. आजचें राज्यदान म्हणजे कादंबांच्या सर्वस्वाचा नाश आहे हें महाराजांचें विधान सपशेल खोटें आहे. उलट हें सर्वस्वाचें संरक्षण आहे. मान्यवर सभासद हो, आजच्या राज्यदानाची शर्त काय आहे ती आपण जाणत आहांत ना ? कादंबांचें राज्य कादंबांना परत करण्याच्या शर्तीवर आज हें राज्यदान केलें जात आहे आणि ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे आजच्या राज्यदानाला राज्यदान हें नांव न देतां राज्यसंपादन हेंच नांव देणें योग्य आहे. मातंगयुवराजांनीं आपल्या पराक्रमानें आपलें राज्य पूर्वींच जिंकून घेतलें आहे—तेव्हां आतां त्यांना तें आपण दान तें काय करणार ? आजचा खरा समारंभ म्हणजे आपल्या हातून गेलेलें राज्य शांततेच्या आणि गोडीगुलाबीच्या मार्गानें परत मिळविण्याचा आहे. गमावून बसण्याचा नाहीं.

**सभा०**:—बरोबर—बरोबर—राणीसाहेबाचें म्हणणें तंतोतंत बरोबर आहे. आणि म्हणूनच या राज्यदानाला आम्हीं पूर्वी आपली संमति दिलेली आहे आणि आजही देत आहोंत.

**कंदर्पः**—( मध्येंच ) सभासदहो, स्वतःच्या पराक्रमानें कमाविलेलें राज्य पहिल्यानें परक्याच्या पदरात टाकून नंतर त्याने दिलेल्या भिक्षेवर संतुष्ट होणें हें कदंबाच्या आजवरच्या पराक्रमाला व लौकिकाला कमीपणा आणणारें आहे असें आपणाला वाटत नाही काय ?

**सभा०**:—वाटतें—जरूर वाटतें. पण या गोष्टीचा विचार यापूर्वींच व्हावयास पाहिजे होता. आतां त्याचा कांहीं उपयोग नाहीं.

**कंदर्पः**—उपयोग नाहीं ? कां उपयोग नाहीं ? या लांछनास्पद दुष्कर्मापासून आपण अजूनही परावृत्त होऊं शकतो. आणि तहनाम्यांतील राज्यदानाची शर्त धुडकावून देऊन आपला अधःपात टाळूं शकतो.

**सौदा०**:—छे,—तें आतां मुळींच शक्य नाहीं. एकवार पूर्ण विचारपूर्वक मान्य केलेली शर्त आतां ऐनवेळीं मोडणें म्हणजे मातंगेश्वराविरुद्ध युद्ध

पुकारणें आहे; आणि आजच्या बिकट परिस्थितींत मातंगेश्वराशीं युद्धास उभें रहाणें म्हणजे आपण होऊन आपल्या हातानें आपल्या मानेवर सुरी चालविण्यासारखें आहे.

**सभा०:**---बरोबर-बरोबर. अगदीं बरोबर. आजचा प्रसंग युद्धाला मुळींच अनुकूल नाहीं. युद्धाची वेळ पूर्वीच निघून गेली. आणि त्या वेळीं जर सरकारांनीं युद्धाचा निश्चय केला असता तर कदंब-राजसभेनें त्यास मोठ्या आनंदानें आपला पाठिंबा दिला असता. पण त्या वेळीं सरकारानीं माघार घेतली,-हार कबूल केली व मातंगाशीं तह केला. तेव्हां आतां महाराजांनीं तहांतील शर्तीबरहुकूम अखेरपर्यंत वागलेंच पाहिजे. नाहीं तर असत्यवादी अधर्माचारी म्हणून साऱ्या जगांत कदंबाची अपकीर्ति होईल.

**कंदर्पः**—तर मग या राजसभेंत मला एक क्षणभरही थाबावयाचें नाहीं. सभासदहो, या क्षणापासून मी तुमचा राजा नाहीं व तुम्ही माझे प्रजाजन नाहीं. आणि या सिंहासनाचा स्वामी म्हणून त्यावर बसण्यास यापुढें मी तयार नाहीं. ( सिंहासनाखालीं उतरून ) घ्या. हें सिंहासन आणि हा राजमुगुट मी तुमच्या स्वाधीन करतों-तो घ्या आणि वाटेल त्या चोराच्या खुशाल हवाली करा माझा आता त्याच्याशीं काहीं एक संबंध राहिला नाहीं. ( राजमुगुट काढून सिंहासनाच्या पायरीवर ठेवतो व जाऊं लागतो. कालकूट त्यास आडवा होतो. )

**काल०:**—सरकार-सरकार-हे काय करीत आहांत आपण ?

**कंदर्पः**—महाराज प्रतापादित्यांच्या पुत्राला शोभेल तेंच मी करीत आहें. ज्या सिंहासनापुढें नाक घासतां घासता मातंगेश्वराच्या नाकाचा शेंडा पार झिजून गेला तें सिंहासन आज त्याच्याच नालायक पुत्राच्या पायाखालीं तुडविलें जात असलेलें मुकाट्यानें पाहणें मला शक्य नाहीं. चला दूर व्हा.-माझा रस्ता मला मोकळा करा -मला जाऊं द्या.—

**सौदा०:**—नाहीं. आपल्याला येथें थांबलें पाहिजे व राज्यदानाची शर्त पुरी केली पाहिजे.

**कंदर्पः**—मीं राजसिंहासन,-राजमुगुट आणि राज्य तुमच्या स्वाधीन केलें आहे. तेव्हां आतां तहनाम्यांतील शर्ती पुऱ्या करण्याची जबाबदारी तुमच्या शिरावर आहे-माझ्या शिरावर नाहीं

**सौदा०**:—छे, असले लपंडाव मुळींच चालणार नाहींत. राजसभेची इच्छा नसतां आपण मातंगांचा तह राजसभेवर लादला आहे. तेव्हां त्याची पूर्तता होईपर्यंत आपणांस सिंहासनाचा त्याग करतां येणार नाहीं—राजमुगुटाचा त्याग करितां येणार नाहीं आणि राजसभेचाही त्याग करतां येणार नाहीं. महाराजांना मी हात जोडत्यें—पदर पसरत्यें. असा आततायीपणा महाराजांनीं करूं नये. त्यापासून काडीचाही लाभ व्हावयाचा नाहीं. उलट आपली स्वत:ची आणि आपल्या राष्ट्राची अतोनात हानि मात्र होईल. ( त्याला अडविते. इतक्यांत एक लष्करी अंमलदार प्रवेश करतो. )

**अंमल०**:—सरकार, युवराजांची स्वारी राजवाड्यांतून निघाली असून अर्ध घटकेच्या आंत राजसभेच्या महाद्वारीं येऊन दाखल होईल असा सेनापतींचा संदेश आला आहे.

**सौदा०**:—प्रधानजी आपण महाद्वारावर युवराजांचें स्वागत करण्यास जा.

**काल०**:—महाद्वारावर स्वतः महाराज—

**सौदा०**:—महाराज राजसभेंत स्वागत करतील. तुम्हीच महाद्वारावर जा.

**काल०**:—जशी राणीसाहेबांची आज्ञा ( जातो. )

**कंदर्प**:—सौदामिनी, मी युवराजाचें राजसभेंत स्वागत करण्यास तयार नाहीं.

**सौदा०**:—( रागानें ) महाराज, बस्. पुरे झाला हा प्रकार. मुकाट्यानें तो मुगुट मस्तकावर धारण करून युवराजांच्या स्वागताला तयार व्हा. आतांपर्यंत आम्हीं आपली फार गय केली. पण यापुढें आम्हांला तसें करतां येणार नाहीं. तहांतील शर्तींप्रमाणें आपल्या हातून राज्यदान झालेंच पाहिजे. तें आपणास प्राणांतींही चुकवितां येणार नाहीं. राज्यदान झाल्यानंतर वाटल्यास आपण राज्याचा लोभ सोडून वाटेल तिकडे खुशाल निघून जा. मी, कालकूट अगर ही राजसभा आपल्या मार्गांत आडवे येणार नाहीं. पण त्यापूर्वी राज्य सोडून जाण्याचा आपण हट्ट धराल तर आम्ही आपणास तत्काल कैद करून युवराज दरबारांत येतांच राजद्रोही गुन्हेगार म्हणून त्यांच्या स्वाधीन करूं. कमी करणार नाहीं. लक्षांत ठेवा.

**कंदर्प**:—काय ? तुम्ही मला कैद करणार !

**सौदा०:**—होय. कैद करूं ! एवढेंच नव्हे तर आपण अधिक गडबड कराल तर आपणास आपल्या प्राणासही मुकावें लागेल हें खूप समजून असा. या वेळीं आपल्यावर कोणतीही दया दाखविली जाणार नाहीं. तेव्हां चला-आतां एकेक क्षण लाख मोलाचा आहे. विलंब लावूं नका.-( मुगुट हातांत घेऊन ) मुकाट्यानें हा मुगुट मस्तकावर धारण करा आणि राजसभेंत युवराजांचें स्वागत करण्यास तयार व्हा. ( मुगुट त्याच्या मस्तकावर ठेवते. इतक्यांत पडद्यांत युवराजाचा जयघोष होतो. )

**कंदर्पः**—तोंड दाबून बुक्क्यांचा मार आहे हा !

**सौदा०:**-चूप. वेडावांकडा एक शब्द तोंडांतून निघतां कामाचा नाहीं. हंसत मुखानें गोड शब्दांत सारा प्रसंग पार पडला पाहिजे.

**कंदर्पः**—ठीक आहे. पाहतों प्रयत्न करून. ( जयजयकारांत कालकूट, युवराज, शृगाल, शिशुपाल, पशुपाल इत्यादि प्रवेश करतात. )

**युव०:**—( चोहोंकडे पाहून स्वगत ) काय ? येथें भयंकर वादळ भडकलें आहे अशी शिशुपालपशुपालांनीं आणलेली बातमी खोटीच कीं काय ?

**सौदा०:**—( हळूंच ) हं महाराजांनीं पुढें होऊन नम्रपणानें युवराजांचें स्वागत करावें.

**युव०:**—( स्वगत ) बातमी खोटी असणें शक्य नाहीं. पण मग येथें एकाएकीं एवढी शांतता कशी उत्पन्न झाली ?

**कंदर्पः**—( हळूंच पुढें सरून ) कदंब-राजसभेंत मातंग युवराजाचें स्वागत असो !

**युव०:**—( हंसून ) कदम्बेश्वरांचा सदासर्वदा विजय असो ! (स्वगत) समजलों. सौदामिनीनें अखेरीस आमच्यावर मात केली. आमचा डाव सपशेल फसला !

**सौदा०:**—युवराजांचें कुशल आहेना ?

**युव०:**—होय, परमेश्वरकृपेनें सर्व ठीक आहे. आपलें कसें काय चाललें आहे ?

**काल०:**—युवराजांच्या मेहेरबानीनें सर्वांचें उत्तम चाललें आहे.

**युव०:**—( स्वगत ) छे.-हें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं. आजची

संधि हातची गेली कीं सारें कारस्थान फुकट गेलें. माझ्या अकलेची परीक्षा लागली.

**सभा०:**—युवराजांच्या शुभागमनानें कादंबराजसभेला महदानंद झाला आहे.

**युव०:**—आम्ही कादंबराजसभेचें अत्यंत आभारी आहोंत. ( स्वगत ) बस्. तें कांहीं नाहीं. आज या ठिकाणीं भडका हा उडालाच पाहिजे.

**सौदा०:**—का ? युवराज कसला विचार करीत आहेत ?

**युव०:**—विचार ? विचार असा कांही विशेष नाहीं. हा आपल्या वैभव-संपन्न राजसभेंत पाय टाकल्यापासून आम्हाला आपल्या बालपणांतील एका विलक्षण प्रसंगाचें वारंवार स्मरण होत आहे. प्रतापादित्यांनीं आमच्या वडि-लांना कुंडलच्या लढाईत पराभूत करून आपला बंदिवान् म्हणून या राज-सभेंत आणलें असतांना आम्हीही त्याच्या समागमें होतों. त्या वेळीं आमचें वय कांहीं फार नव्हतें. पण त्या वेळीं या ठिकाणीं जो भेसूर व भयंकर देखावा आमच्या दृष्टीस पडला तो अजूनही आमच्या डोळ्यापुढें जशाचा तशा दिसत आहे. प्रतापादित्य या समोरच्या रत्नजडित सिंहासनावर दिग्वि-जयी जेत्याच्या डौलानें विराजमान् झालेले होते. जवळ कंदर्पमहाराजांची बालमूर्तिही मोठ्या ऐटीनें वीरासन ठोकून बसली होती. आम्हां उभयतां पितापुत्रांना लढाईतील कैदी म्हणून या सिंहासनासमोर उभे करण्यांत आलें, त्या वेळीं आम्हा पितापुत्राकडे तुच्छतादर्शक उन्मत्त नजरेनें पाहून प्रतापादित्य विजयी जेत्याच्या दिमाग्यानें मोठ्यानें हांसले. कंदर्पाची बाल-मूर्तिही त्यांच्याबरोबर आम्हांकडे पाहून हासत होती. प्रतापादित्याची हृद-याचा भेद करणारी ती दुष्ट दृष्टि आणि उपहास दर्शविणारें ते निर्दय हास्य आठवलें कीं—

**सौदा०:**—( मध्येंच ) युवराजांनीं आजच्या शुभ प्रसंगीं असल्या दुः-खदायक गतगोष्टींच्या स्मरणानें आपल्या जिवाला निष्कारण त्रास करून घेऊं नये.

**युव०:**—बरोबर आहे. बाईसाहेबाचें हें म्हणणें अगदीं बरोबर आहे. परंतु खरें पाहिलें तर या स्मरणानें आजच्या मंगल प्रसंगीं आमच्या चित्ताला

विषाद वाटत नसून हर्षच होत आहे. कांहीं कालापूर्वी ज्या ठिकाणीं आम्ही लाजेनें व दुःखानें खालीं माना घालून केंविलवाण्या नजरेनें जमिनीकडे पहात पामराप्रमाणें उभे होतों त्याच ठिकाणीं आज उन्मत्तपणानें आम्हांला हांसणारे-आमचा उपहास करणारें आमचे कट्टे दुश्मान् आमच्यासमोर तेजोहीन होत्साते लज्जेनें मान खाली घालून-पण जाऊं द्या. आजच्या शुभ प्रसंगीं आम्ही आपल्या पूर्व अपमानाचें व अप्रतिष्ठेचें स्मरण करणें जसें उचित नाहीं तसेंच पराभवानें लाचार होऊन आपलें मित्रत्व संपादन करण्यास उत्सुक असलेल्या आपल्या बलहीन व तेजोहीन अशा लज्जाकुल शत्रूच्या लज्जास्पद अपमानाची व अप्रतिष्ठेची त्यास जाणीव करून देणेंही आमच्यासारख्या दिग्विजयी वीराला युक्त नाही. वार करावयाचा झाला तरी जिवंतावर करावा. मेल्यावर वार करण्यांत शूराना भूषण नाहीं.

**कंदर्पः**—( स्वगत ) संतापानें मस्तक फिरूं लागलें !

**सौदा०:**—महाराजानीं युवराजाचा हात धरून त्यांना सिंहासनावर बसवावें.

**युव०:**—( स्वगत ) नमनाचाच बाण पण चागला वर्मी झोंबल्यासारखा दिसतो. ठीक आहे. आता पुढचें मैदान क्षणांत खुलें करून टाकतों साफ !

**कंदर्पः**—( हात पुढे करून ) यावें युवराजानी—

**सौदा०:** - युवराजानी महाराजाचा हात धरून सिंहासनावर चढावें.

**युव०:**—जशी बाईसाहेबांची इच्छा ! ( कंदर्पाचा हात धरून ) आपला हात असा गरम कां लागतो ? आपली प्रकृति ठीक नाहीं काय ?

**सौदा०:**—प्रकृति ठीक आहे.

**युव०:**—समजलों. आपलें सिंहासन आपल्या कट्ट्या दुश्मानाच्या पायाखालीं तुडविलें जात असलेलें पाहून कोणत्याही स्वाभिमानी शूर पुरुषाची प्रकृति थोडीबहुत गरम ही होणारच; परंतु कदंबेश्वरांनीं त्याबद्दल चित्तास विषाद मानून घेऊं नये. एका कालीं आम्ही रडत होतों आणि आपण हंसत होता. आज आम्ही हंसत आहोंत-आपणावर रडण्याची पाळी आली आहे. झालें. फिटासफीट झाली. त्यांत मनास लावून घेण्यासारखें कांहींच नाहीं. गर्वाचें घर एक दिवस खालीं हें झालें पाहिजे हा ईश्वरी नियमच आहे.

**कंदर्पः**—( स्वगत ) या उद्दाम माणसाचे हे मर्मभेदक शब्द माझा संताप अधिकाधिक चेतवीत आहेत. ( युवराजास सिंहासनावर बसवितो. जयजयकार होतो. )

**युव०**:—( सिंहासनावर बसल्यावर ) ( स्वगत ) बाण वर्मी झोंबतात. पण ज्वालामुखीचा अजून स्फोट होत नाहीं. काय करावें ? सौदामिनीनें दाढ पक्की बांधलेली दिसते. ( उघड ) कंदर्प, बाईसाहेब आणि मान्यवर सभासदहो, आपणही आपल्या आसनावर बसा. शृगालराज, ज्या सिंहासनानें उन्मत्तपणानें महाप्रभावशाली राजराजेश्वर मातंगाधिपतींचा हरघडीला मानभंग केलेला आहे त्या सिंहासनाला पायांखालीं तुडवून त्यावर मातंगेश्वरांचा अतुल पराक्रमी पुत्र—मातंगांचा दिग्विजयी युवराज—आज जेता या नात्यानें आरूढ झाला ही मंगल वार्ता या क्षणीं दूतांच्या हस्तें मातंग राजधानीस पाठवा. म्हणजे ती ऐकून सुडासाठीं रात्रंदिवस तळमळत असलेल्या मातंगेश्वराला व मातंग प्रजाजनांना परमहर्ष होईल व ते आम्हांला आपले शुभाशीर्वाद पाठवितील.

**सौदा०**:—( स्वगत ) युवराजांचे शब्द घात करणारसें दिसतें. तेव्हां आतां हा प्रसंग झटपट आटोपतां घेतला पाहिजे. ( कंदर्पास उघड ) महाराजांनीं आतां आपल्या मस्तकावरचा मुगुट काढून युवराजांच्या चरणीं अर्पण करावा.

**कंदर्पः**—( स्वगत ) काय करावें ? कांहीं सुचत नाहीं. मनाचे लगाम तुटत चालले-संताप अनावर होऊं पहात आहे. वाटतें कमरेची तरवार काढून या चांडाळाच्या छातींत खुपसावी आणि या राज्यदानाच्या अभद्र नाटकाचा येथेंच एकदम शेवट करून टाकावा !

**काल०**:—( कंदर्पास ) सरकार असे स्तब्ध कां उभे राहिले आहेत ?

**कंदर्पः**—( अनावर संतापानें ) स्तब्ध कां उभा राहिलों आहें ? काळकूट, या उन्मत्त युवराजाच्या तोंडचे उद्दाम शब्द तुमच्या कोणाच्याच कानांवर जाऊन आदळले नाहींत काय ?

**युव०**:—( उसळल्यासारखें दाखवून) काय ? उन्मत्त युवराज ! उद्दामशब्द !—सौदामिनी बाईसाहेब—

**सौदा०:**—युवराजांनीं शांत असावें. भूतकालाची आठवण युवराजांना टाळतां आली नाहीं-तशीच वर्तमानकालाची जाणीव महाराजांनाहि टाळतां येत नसल्यास त्यांत विशेष काय आहे? मनुष्यस्वभावाचा हा साहजिक धर्मच आहे. ( कंदर्पास ) महाराज, ही वेळ चित्तवृत्ति क्षुब्ध होऊं देण्याची नाहीं. युवराज कांहीं बोलले तरी तें महाराजांनीं या वेळीं शांतपणानें ऐकून घेतलें पाहिजे व तहनाम्यांतील शर्ती पूर्ण करून आपल्या जबाबदारींतून मुक्त झालें पाहिजे.

**काल०:**—राणीसरकारांचें म्हणणें अगदीं यथार्थ आहे. भलत्यासलत्या गोष्टीकडे लक्ष देऊन मुख्य मुद्द्याकडे दुर्लक्ष करणें सुज्ञांस उचित नाहीं व इष्टहि नाहीं. तेव्हां सरकारांनीं मुगुट काढून युवराजांच्या पायांवर ठेवावा व आपल्या वचनांतून मुक्त व्हावें.

**सभा०:**—आम्हा सर्व सभासदांचाहि असाच अभिप्राय आहे.

**कंदर्पः**—( स्वगत ) अरेरे!–हा माणसांचा दरबार आहे का मढ्यांचा दरबार आहे! माझ्या अंतःकरणांत आगीचा एकच डोंब उसळून गेला असतां या फत्तरांचीं अंतःकरणें बर्फाप्रमाणें थंडगार कशीं पडलीं आहेत! देवा-देवा-अशा मुर्दाड प्रेतांचा धनि करण्यापेक्षां तूं मला उकिरड्यावर लोळणारें गाढव बनविलें असतेंस तरी त्यांतसुद्धां आनंदच मानिला असता. हरहर! कोण ही माझी दुर्दशा!

**युव०:**—( स्वगत ) आतां आणीबाणीची वेळ आहे. या वेळीं आपल्या वाणीची धार बोथटूं देतां कामाची नाहीं. आतां अवसर न देतां सारखा भडिमार सुरू केला पाहिजे. ( उघड ) कंदर्प, शरणागतीच्या तहनाम्यावर सही करतांना ज्या निर्लज्ज मुर्दाड मनाला तिळमात्रही शरम वाटली नाहीं त्यानें आतां तो तहनामा पुरा करतांना असें उज्ज्वल स्वाभिमानाचें उसनें अवसान अंगीं कां आणावें हेंच आम्हांला समजत नाहीं. आपण या वेळीं हा मुगुट आमच्या पायांवर अर्पण केला नाहीं तर तो आपल्या मस्तकावरून कोलमडून आमच्या पायाशीं येऊन पडणार नाहीं अशी का आपली कल्पना आहे? आमच्या डोळ्याच्या एका इषाऱ्याबरोबर तो मुगुटच काय पण तो धारण करणारें हें चढेल मस्तकसुद्धां या आमच्या पायांवर लोटांगण घालीत येईल हें खूप समजून असा.

**सौदा०:**—( स्वगत ) काय करावें ? युवराज आज फारच बेताल बोलूं लागले आहेत. त्यांना आतां दाबलेंच पाहिजे. नाहीं तर येथें भलताच प्रसंग ओढवल्यावांचून रहाणार नाहीं. ( उघड ) विजयानंदानें बेहोष झाल्यामुळें युवराजांच्या वाणीचा तोल सुटत चालला आहे, हें युवराजाच्या लक्षांत आलेलें नाहींसें दिसतें. युवराजांनीं जरा शांत व्हावें. म्हणजे सर्व गोष्टी सुरळीतपणें पार पडतील. ( कंदर्पास ) महाराजांनी कालाचा व्यर्थ अपव्यय करून निकरावर प्रसंग आणूं नये. युवराजांच्या पायांवर मुगुट वाहण्याशिवाय महाराजांना आता सुटका नाहीं.

**कंदर्पः**—( विचार करून ) ठीक आहे. तुम्हा सर्वांची तशीच इच्छा आहे तर हा मी आपला मुगुट युवराजाच्या पायांवर वहातों आणि तहातील अखेरची शर्त पुरी करून आरंभिलेल्या पातकाची परिसमाप्ति करतों. ( मुगुट युवराजाच्या पायांवर ठेवतो. )

**सौदा०:**—( स्वगत ) आतां जीव खालीं पडला. देव करो आणि मुगुट परत घेण्याची बुद्धि याला न होवो ! म्हणजे माझें काम झालें !

**कंदर्पः**—सभासदहो, आतां मी तुमच्या ऋणांतून सर्वस्वी मुक्त झालों आहें. यापुढें मी तुमचा कोणी नाहीं—तुम्ही माझे कोणी नाहीं आणि मी आतां कोणाचें कांहीं देणें लागत नाहीं. ( सिंहासनाखालीं उतरूं लागतो ).

**युव०:**—( स्वगत ) पुनः डाव उलटला. आतां काय करावें ?

**सौदा०:**—( कंदर्पास ) महाराज, खालीं कशाला उतरतां ? आपण आपली शर्त पुरी केलीत. पण युवराजानीं आपली शर्त अद्यापि पुरी केलेली नाहीं.

**कंदर्पः**—मला युवराजांच्या शर्तीशीं काय करावयाचें आहे ? माझा आतां कोणाच्याही शर्तीशीं कांहींही संबंध उरलेला नाहीं.

**सौदा०:**—नाहीं कसा ? हा मुगुट आपला आ—हें सिंहासन आपलें आहे; आणि तहनाम्यांतील शर्तीप्रमाणें तें आपणांस आतां परत मिळणार आहे.

**कंदर्पः**—शत्रूनें घातलेली भीक म्हणून माझा मुगुट आणि माझें सिंहासन मला परत नको आहे. हा राजमुगुट फिरून माझ्या मस्तकावर तळपं

लागावयाचा असेलच तर तो माझ्या पराक्रमाचें चिन्ह म्हणूनच तळपूं लागेल. नाहीं तर मला त्याची पर्वा नाहीं. दुश्मानाच्या दयेचें लांछन म्हणून निर्लज्जपणाच्या डौलानें तो या मस्तकावर मिरविण्यापेक्षां हें मस्तक यावज्जन्म उघडें राहिलें तरीही त्यांत मला आनंदच होईल. ( खालीं उतरतो )

**युव०**:—( स्वगत ) हो—आतां असेंच. ( उघड ) थांबा—कंदर्प, थांबा तुम्हाला हा राजमुगुट—हें राजसिंहासन आणि हें राज्य परत घ्यावयाचें नसेल तर खुशाल घेऊं नका. आम्ही तुमच्या ऐवजीं तें दुसऱ्या कोणासही देऊं व आपल्या वचनातून मुक्त होऊं. परंतु तुम्हाला आमच्या हस्तें राज्य घ्यावयाचें नसलें तरी या मातंग युवराजाच्या पायाशीं मातंग राजनिष्ठेची शपथ तुम्हाला केली पाहिजे व आपली तलवार मातंग राजसेवेस वाहिली पाहिजे.

**कंदर्पः**—काय ? मातंग—युवराजाच्या पायाशी मातंग—राजनिष्ठेची शपथ ? आणि मातंग—राजसेवेंत माझी तलवार अर्पण ! छे—हें तर आतां कालत्रयीं घडावयाचें नाही.

**युव०**:—काय ? कालत्रयीं घडावयाचें नाहीं ?

**कंदर्पः**—नाहीं—नाहीं—कालत्रयीं घडावयाचें नाहीं. परक्यांच्या पदरांत राज्य टाकून मी राज्यहीन झाली असलों तरी स्वातंत्र्यहीन होण्याची माझी इच्छा नाहीं. आणि ( तलवारीला हात घालून ) ही स्वातंत्र्याची अधिष्ठात्री देवता माझ्या कमरेस विळखा घालून बसली आहे तोंवर माझ्यापासून माझें स्वातंत्र्य हिरावून घेण्याची कोणाचीही प्राज्ञा नाहीं.

**युव०**:—कंदर्प, तुमच्यापासून तुमचें राज्य हिरावून घेणारा पराक्रम तुमचें स्वातंत्र्य धुळीस मिळवावयाला असमर्थ आहे असें तुम्ही समजूं नका.

**कंदर्पः**—असें असेल तर त्या पराक्रमाचें सामर्थ्य मला आतां अजमावून पाहिलेंच पाहिजे. हें उन्मत्त युवराजा, ऐक—ऐक—मी काय सांगतों तें नीट लक्षपूर्वक ऐक—तुझ्या पायाशीं मातंग-राजनिष्ठेची शपथ करण्यास तर हा कंदर्प तयार नाहींच नाहीं; पण एवढेंच नव्हे, तर एक दिवस या सिंहासनावरून तुला ओढून काढून—बोकडाप्रमाणें बुकलून बुकलून तुझा प्राण घेऊन हे सिंहासन मातंगांच्या गुलामगिरींतून सोडविल्यावांचूनहा मी रहाणार नाहीं हें तूं खूप समजून ऐस.

**युव०**:--( चवताळून ) सभासदहो, ऐका-ऐका. हे या उन्मत्त माथेफिरूचे उद्दाम शब्द ऐका आणि ते आपणांला मान्य आहेत का तें आम्हांला सांगा. आम्ही आतांपर्यंत फारच शांतपणा धारण केला होता. पण आतां आम्हाला शांत राहतां येणें शक्य नाहीं. प्रत्यक्ष आमचा प्राण घेण्याची प्रतिज्ञा आम्ही मुकाट्यानें ऐकून कशी घेणार ? तेव्हां बोला-तुमच्या राजाच्या या आततायी कृतीला तुमची संमति आहे का ! बोला.

**सभा०**:--नाहीं-नाहीं. मुळींच नाहीं. युवराजांच्या पायाशीं राजनिष्ठेच्या शपथा घेण्यास व आपले तनमनधन मातंगेश्वरांच्या सेवेस अर्पण करण्यास आम्ही अत्यंत लीनतापूर्वक तयार आहोंत ( तरवारी काढून मुजरा करतात ).

**युव०**:--कंदर्प, तुमच्या राजसभेकडून आम्हांला मिळालेलें हें राजनिष्ठेचें आश्वाशन तुम्हांला ऐकूं आलें का ? पाहा-अजूनही विचार करा-आणि आतां उच्चारलेले राजद्रोही शब्द परत घेऊन आमच्या पायाशीं मातंग-राजनिष्ठेची शपथ वहा. आम्ही तुम्हांस तुमच्या सर्व अपराधांची क्षमा करण्यास तयार आहोंत.

**कंदर्प**:--आपल्या क्षमेची मला बिलकुल पर्वा नाहीं. माझा निर्धार एकदां कायम झाला तो झाला. यापुढें तुम्ही माझे दुश्मान आणि मी तुमचा दुश्मानच्च राहणार; आणि आपणां दोघांपैकीं कोणी तरी एक पुरा धुळीस मिळेपर्यंत आपलें शत्रुत्व सारखें भडकत जाणार.

**युव०**:--तर मग कालकूट, या बदमाष बंडखोराला एकदम कैद करा.

**कंदर्प**:--( तरवार उपसून ) या-कोण मला कैद करण्याकरितां येणार ते या. हा पहा-मी तुम्हां सर्वांसमक्ष या राजसभेंतून बाहेर पडतों. ज्याची हिंमत असेल त्यानें माझा रस्ता अडवावा आणि आपल्या पराक्रमाची परीक्षा पहावी ( निघून जातो. )

**युव०**:--अडवा-धरा-पकडा त्याला.— पडदा पडतो.

## अंक तिसरा समाप्त.

# अंक चौथा.



## प्रवेश पहिला.

( स्थळः—राजवाडा. शिशुपाल आणि पशुपाल प्र. क. )

**शिशु०:**—काय रे आतां ही महामाया कदंबाच्या राज्याची मालकीण होणार तर एकूण ?

**पशु०:**—छे रे ? तिला सुमडीला कोण राज्य द्यावयाला बसलें आहे ? राज्य म्हणजे कांहीं धर्मशाळेंतलें उखळ नाहीं कीं वाटेल त्यानें यावें आणि खुशाल कांडत बसावें ! राज्य म्हणजे तें राज्य आहे आणि तें ज्याला मिळवयाचें त्यालाच तें मिळावयाचें. भलत्या सलत्या गंगाजम्नी कुलावंतांना त्याची प्राप्ति कधींही व्हावयाची नाहीं. भोलेनाथ !

**शिशु०:**—तर मग शृगालराजांनीं तिला असें कळवावयाला आपल्याला इकडे पाठविलें तें उगीचच कां ?

**पशु०:**—उगीच कसें असेल ? अरे त्यांत त्यांचा डाव आहे. राज्याची लालुच दाखवून त्यांना तिला आपल्या घाण्याभोंवतीं कांहीं दिवस फिरवावयाचें आहे. त्यांचा डाव साधला कीं इचा भाव उतरला. मग इला फुकट सुद्धां कोणी विचारणार नाहीं. भोलेनाथ !

**शिशु०:**—तर मग युवराज तिचें पाणिग्रहण करणार आहेत हीसुद्धां शृगालराजांची थापच असली पाहिजे.

**पशु०:**—बिलकूल थाप ! एक अक्षर खरें असेल तर भोलेनाथ ! अरे, माझ्यासारखा फटिंगसुद्धां या उनाड मैनेला लग्नाची तर राहोच पण बिनलग्नाची बायको म्हणून सुद्धां पत्करणार नाहीं; मग युवराजासारख्या वैभवसंपन्न राजपुत्राची गोष्ट कशाला बोलतोस ? आपला* मतलब साधल्यावर ते इच्याकडे नुस्ते ढुंकून पहावयालासुद्धां राजी होणार नाहींत हें मी तुला पैजेवर सांगतों. भोलेनाथ !

**शिशु०:**—तर मग ही शृगालराजांची सारी लफंगेगिरीच आहे म्हणावयाची ?

**पशु०:**—नाहीं-शिशुपाल, लफंगेगिरी नाहीं;-हें राजकारण आहे. मुत्सद्द्यांच्या लफंगेगिरीला शास्त्रांत राजकारण अशी संज्ञा आहे. भोलेनाथ !

**शिशु०:**—कदंबाचें राणीपद नाहीं-मातंगाचें युवराज्ञीपद नाहीं. मग आतां या मंचकमावशीला मिळणार तरी काय ?

**पशु०:**—दुसरें काय मिळणार ? हातांत हात आणि कमरेंत लाथ ! भोलेनाथ !

**शिशु०:**—अरे-अरे ! दैनाच आहे तर बिचारीची !—

**पशु०:**—दैना-आणि बिचारीची ! भले शाबास ! अरे, जिनें कदंबाचें एवढें प्रचंड राज्य आपल्या करामतीनें धुळीला मिळविलें ती बिचारी काय ? मी तर म्हणतों कीं, या महापातकाबद्दल या तुझ्या बिचारीला रोज दिव-सांतून तीन वेळां सुळावर चढविलें तरी तें सुद्धां कमीच होईल. पण जाऊं दे. मेल्याच्या आधीं सुतकाचा वाद पाहिजे कशाला ? तिचें पुढें कांहीं व्हावयाचें असलें तरी तूर्त तिच्या लटक्या लग्नाचीं मंगलाष्टकें म्हणण्याचें काम शृगालराजांनीं आपणाकडे सोंपविलें आहे. तेव्हां तें पहिल्यानें इमानें इतबारें उरकून टाकूं. नवरा मरो नाहींतर नवरी मरो-भटांची नजर नेहेमीं दक्षिणेवर स्थिर असली पाहिजे. बाबारे, काम चोख तर पैसा रोख. (पाहून) अरे वा-मंगलाष्टकांचें नांव काढतांच नवरी मुलगी आपली नटून सजून बोहल्यावर दाखल. हं-हे करुणेच्या मृतसमुद्रा, आतां अंतःकरणांत उठले-ल्या ढोंगी दयेच्या लाटा आवरून धरून पूर्ववत् फत्तरासारखा कठोर हो आणि शृगालांनीं दिलेल्या संथेची मनांतल्या मनांत चटकन् उजळणी करून या नवरदेवीच्या लग्नाचे मंत्र म्हणण्यास सुरवात कर. चल् हो पुढें-तुझ्या तोंडांतून ' सावधान ' निघालें कीं मी अक्षतांचा भडिमार करतों. भोलेनाथ !

( सौदामिनी प्रवेश करते. )

**शिशु०:**—( मुजरा करून ) राणीसरकारांचा विजय असो !

**पशु०:**—( मुजरा करून ) युवराणीसरकारांचा विजय असो !

**सौदा०:**—कायरे मेल्यांनो, लागली का कांहीं बातमी ?

शिशु०:—लागली म्हणजे ? लागलीच लागली. राणीसरकार धन्य आहेत ! —

पशु०:—युवराणी सरकार—भोलेनाथ !

सौदा०:—म्हणजे ?

शिशु०:—म्हणजे काय ?. राणीसरकार राणी झाल्या !—

पशु०:—राणीसरकार युवराणी झाल्या—भोलेनाथ !

सौदा०:--काय ? मी कदंबाची राणी झाल्यें ?-मातंगांची युवराणी झाल्यें ?

शिशु०—झाल्या म्हणजे होणार. —

पशु०—आणि होणार म्हणजे झाल्याच. अगदीं बेशक-बेलाशक-बेधडक झाल्याच ! भोलेनाथ !

सौदा०:—शृगालांनीं माझी शिफारस केली ?

शिशु०:—अगदीं कसून केली.—

पशु०:—बिलकूल ठांसून केली—भोलेनाथ !

सौदा०:—युवराजांचा राग गेला ?

शिशु०:—पार गेला—

पशु०:—ठार झाला—भोलेनाथ !

सौदा०:—अहाहा ! माझा हर्ष गगनांत मावेनासा झाला !

शिशु०:—आणि आमचा त्रिभुवनांत मावेनासा झाला !

पशु०:—जिकडे तिकडे आनंदी आनंद—जिकडे तिकडे—भोलेनाथ !

सौदा०:—शिशुपाल, पशुपाल—तुम्ही ही आनंदाची बातमी आणलीत त्याबद्दल मी तुम्हांला काय देऊं ?

शिशु०:—काय वाटेल तें द्या.—

पशु०:—फक्त कोरडे आशीर्वाद मात्र नकोत.—बाकी सर्व भोलेनाथ !

सौदा०:—तर मग आजपासून तुम्ही कदंब दरबारचे अव्वल दर्जाचे सरदार झालांत !

शिशु०:—राणीसरकारांचा जयजयकार असो !

पशु०:—युवराणीसरकारांचा जयजयकार असो !

सौदा०:–कायरे मी कदंबाची राणी झाल्यें तर लोकांना आवडेल का?

शिशु०:—यांत काय संशय ? सरकार थोर आहेत—

पशु०:—चोरावर मोर आहेत—

शिशु०:—सरकार दिलदार आहेत.

पशु०:—कलदारांत कलदार आहेत—

शिशु०:—असली राणी लाभायला सात जन्मांचें पुण्य पदरीं पाहिजे.

पशु०:—सात काय ? सातशें जन्मांचें पुण्य पदरीं पाहिजे. भोलेनाथ !

सौदा०:—शिशुपाल–पशुपाल–तुम्ही आज फारच गोड बोलत आहांत !

शिशु०:—गोड माणसासंबंधानें कडू कसें बोलतां येणार ?

पशु०:—बरोबर–अगदीं भोलेनाथ ! माणूस गोड–विषय गोड–आणि बोलणारेसुद्धां गोड–मग या गोडीगोड त्रिवेणी संगमांतून गोड शब्दांवांचून दुसरें काय बाहेर पडणार ? भोलेनाथ !

सौदा०:—( आनंदून ) अहाहा ! अहाहा ! ! तो हर्षाचा दिवस केव्हां उजाडतो असें मला झालें आहे. तेजस्विनी फांसावर चढण्यापूर्वी जर मला कदंब–राजसिंहासनावर चढता आलें तर काय बहार होईल ! तें कांहीं नाहीं–मातंगांची युवराज्ञी होण्याला अवकाश लागला तरी चालेल, पण कदंबाचें राणीपण मला तावडतोब मिळालें पाहिजे.

पशु०:—( हळूंच शिशु० स एकीकडे ) शिशुपाल, तट्टाणी लागली चौखुरी उडावयाला ! आतां इचें तांडव पहाण्यांत मौज आहे. भोलेनाथ !

शिशु०:—पण इच्या या तांडवांत आपल्याला लत्ताप्रसाद मिळावयाचा नाहीं ना ?

पशु०:—छेरे–इच्या तंगड्या शेवटीं इच्याच गळ्यांत घालून आपण मोकळे होणार ही बालंबाल खात्री असूं दे. अरे ही शेर तर आपण सव्वाशेर आहोंत. भोलेनाथ !

सौदा०:—कायरे, आतां युवराज कोठें आहेत ?

शिशु०:—कां ? युवराजांशीं सरकारांचें काय काम आहे ?

सौदा०:—मला त्यांचे आभार मानावयाचे आहेत.—

**शिशु०:**—हां—हां—हां—हां—त्या भानगडींत सरकारांनीं इतक्यांत पडूं नये. कारण आम्ही सांगितलेली बातमी गुप्त आहे.

**पशु०:**—आणि आमच्याकडून ती बाहेर फुटली असें जर युवराजांना कळलें तर ते आम्हांला पुनः आपल्या आसपास फिरकूंसुद्धां देणार नाहींत. भोलेनाथ !

**शिशु०:**—तेव्हां सरकारांनीं तूर्त या बाबतींत अगदीं मौन धरलें पाहिजे.

**पशु०:**—अगदीं एक शब्दही कोठें बोलूं नये. या कानानें ऐकलें आणि त्या कानानें सोडून दिलें असा कोराकरकरीत कारभार ठेवला पाहिजे. भोलेनाथ ! ( देवल येतो ):—

**देवल**—सरकार, युवराजांची स्वारी इकडे येत आहे.

**सौदा०:**—तर मग—पशुपाल, शिशुपाल, तुम्ही आतां येथून चालते व्हा.

**शिशु०:**—कां ?

**पशु०:**—आम्ही असलों तर काय बिघडलें ?

**सौदा:**—अरे बाबांनो, येथें आतां राजकारणाची चर्चा चालणार आहे ?

**शिशु०:**—बरें मग ? आम्हांला सुद्धां राजकारण समजतें.

**पशु०:**—आणि आम्ही सुद्धां राजकारण बडबडूं शकतों. भोलेनाथ !

**सौदा०:**—काय वात्रट आहांत रे तुम्ही !

**शिशु०:**—हां--हां--हां--हां—अव्वल दर्ज्याच्या सरदारांचा हा अपमान आहे.—

**पशु०:**—अव्वल दर्ज्याच्या सरदारांचा हा उपमर्द आहे--यापुढें वात्रट-फाजिल--मेल्या-जित्या असले हलके शब्द आमच्यासंबंधानें वापरणें दरबारी शिस्तीला धरून होणार नाहीं. सरदारसाहेब--जहागीरदारसाहेब अशा टोलेजंग नांवांनींच सरकारांनीं आम्हांला आतां पुकारलें पाहिजे. भोलेनाथ !

**सौदा०:**—अस्सें ? देवल, या सरदार—जहागीरदारसाहेबांना धक्के मारून बाहेर काढ पाहूं.

शिशु०:—नको-नको-सरकारांनीं घुस्सा होऊं नये.

पशु०:—आम्ही धक्क्यावांचून आपला रस्ता धरावयाला कबूल आहोंत. भोलेनाथ! ( दोघे जातात. दुसऱ्या बाजूनें युवराज, कालकूट व शृगाल प्रवेश करतात ).

सौदा०:—देवल, तूंही जा. ( देवल जातो. )

युव०:—कालकूट, न्यायसभेचा ठीक बंदोबस्त झाला ?

काल०:—ठीक बंदोबस्त झाला. न्यायाच्या देखाव्यांत कोणत्याही प्रकारचा कमीपणा राहूं न देतां तेजस्विनीला देहान्त शासन देण्याचें न्यायाध्यक्षांनीं व न्यायसभेंतील सभासदांनीं कबूल केलें. पैसा आणि फांस यांची करामतच अजब आहे.

युव०:—न्यायमंदिरांत करावयाच्या लटक्या भांडणाच्या नाटकाचा प्रसंग नीट बसविला ?

शृगाल:—अगदीं बेमालूम बसविला. न्यायाध्यक्षांच्या न्यायाचा कांगावा व कालकूटांचा अरेरावी धिंगाणा इतके सफाईदार वठतील कीं तेजस्विनी सुटणार अशीच अखेरपर्यंत सर्वांना खात्री वाटेल आणि शेवटीं सपशेल निराशा होईल.

युव०:—हें भांडणाचें नाटक बेमालूम वठलें आणि आपणाला शिताफीनें लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकतां आली तर चाणक्याचें कारस्थान सुद्धां आमच्या कारस्थानापुढें फिकें ठरेल. ( सौदा०-स ) काय? बाईसाहेब, कंदर्पाचें मन वळण्याचा रंग कसा काय दिसतो ?

सौदा०:—युवराज कंदर्पाचें मन वळविण्याची एवढी तसदी कां घेत आहेत मला कळत नाहीं. त्याच्या मूर्खपणानें कदंबाचें राज्य आयतें पदरांत पडलें आहे तें फुकटाफुकट हातांतून जाऊं देण्याची युवराजांना एवढी हौस कां ?

युव०:—बाईसाहेब, मातंग सम्राटाला कदंबाच्या राज्यापेक्षां स्वतःच्या यशाची अधिक चाड आहे. मातंगेश्वर दिलेलीं वचनें पाळीत नाहीं असा त्याचा जगांत दुर्लौकिक झाला तर यापुढें जगांत त्याच्यावर कोणी विश्वास ठेवणार नाहीं.

**सौदा०:**—पण यांत वचनभंग कोठें आहे ? आपण कदंबाचें राज्य कादंबांना परत द्यावयास तयार असतां कदंबाधिपति तें मूढपणानें लाथाडीत आहे त्याला आपण काय करणार ?

**युव०:**—कंदर्प तें लाथाडीत आहे याबद्दलची तरी पुरी शहानिशा झाली पाहिजे ना ?

**सौदा०:**—पुरी शहानिशा ती आणखी काय व्हावयाची ? माझ्यावर युवराजांचा विश्वास आहे ना ? मी कांहीं युवराजांशीं खोटें बोलावयाची नाहीं. मी कंदर्पाची परोपरीनें समजूत घालण्याचा यत्न केला. परंतु तो कांहीं "दान" म्हणून राज्य परत घ्यावयाला तयार नाहीं.

**युव०:**—'दान' हा शब्द त्याच्या कानाला कडू वाटत असला तर आम्ही 'देणगी' म्हणून त्याचें राज्य त्याला परत करण्यास तयार आहोंत. शब्दाबद्दल आमचें मुळीच भांडण नाहीं. कदंबेश्वराचें राज्य कदंबेश्वराला परत करण्याचें आम्ही आश्वासन दिलें आहे आणि तें आम्हांला पुरें करतां आलें म्हणजे आम्हांला बस् आहे.

**सौदा०:**—दान काय अगर देणगी काय–अक्षरांत फरक असला तरी दोहोंचाही अर्थ एकच. तो देणगी म्हणून सुद्धां राज्याचा स्वीकार करण्यास तयार नाहीं.

**युव०:**—पाहूं. या. तुमचे शब्द जेथें फोल ठरले तेथें आमच्या शब्दांना कांहीं मोल येतें कीं काय तें अनुभवून पाहूं या. त्यानें राज्यदानप्रसंगीं आमच्याशीं केलेल्या वर्तनाबद्दल आम्हीं त्यास क्षमा केली आहे असें त्यास कळल्यावर तो आमच्या शब्दाला जरूर मान देईल असें आम्हांला वाटतें. क्षमा ही जगांत एक अलौकिक शक्ति आहे. तिच्यापुढें लीन होणार नाहीं असा प्राणी जगांत विरळा. कालकूट, जा आणि कंदर्पाला आतांच्या आतां आमच्यापुढें हजर करा. ( कालकूट जातो. )

**सौदा०:**—प्रेमानें तेजस्विनीला आपण जिंकलीत; आतां क्षमेनें कंदर्पाला जिंकणार. ठीक आहे. होऊन जाऊं द्या हाही प्रयोग एकदांचा. पण तेजस्विनीप्रमाणें कंदर्पाच्या बाबतींतही आपली निराशा झाली तर पुढें काय करणार आपण ?

**युव०:**—तो मात्र प्रश्नच आहे.

**सौदा०:**—प्रश्न कसला? आपल्याला कदंबाच्या राज्याचा लोभ नाहीं ना?

**युव०:**—मुळींच नाहीं. कदंबाचें राज्य परत करण्याचाच आमचा निश्चय आहे. परंतु तें परत कोणाच्या स्वाधीन करावें हाच आम्हांला पेंच पडला आहे. बाईसाहेबांच्या जर कोणी लायक पुरुष लक्षांत असेल तर त्यांनीं आम्हांला दाखवावा, म्हणजे त्याबद्दल आम्ही विचार करूं.

**सौदा०:**—पुरुषांत कोणी लायक सांपडेल असें कांहीं मला वाटत नाहीं.

**शृगाल:**—मग एखादी स्त्री असली तर सुचवावी.

**सौदा०:**—सुचवावयाला कशाला पाहिजे? युवराजांना ती सहज शोधून काढतां येण्यासारखी आहे.

**युव०:**—बाईसाहेबांचा रोख तेजस्विनीकडे आहे कीं काय?

**सौदा०:**—तेजस्विनी! त्या सटवीची माझ्याजवळ कवडीचीही किंमत नाहीं.

**शृगाल:**—बाईसाहेबांच्या मनांत स्वतःचें नांव सुचवावयाचें आहेसें दिसतें.

**युव०:**—स्वतःचें! म्हणजे? मातंगांच्या युवराज्ञीपदाची किंमत कदंबाच्या राज्ञीपदापेक्षां बाईसाहेब कमी लेखतात कीं काय?

**सौदा०:**—मुळींच नाहीं. मातंग युवराज्ञीचें पद कदंबाच्या राणीपदापेक्षां निःसंशय अधिक आहे—पण हीं दोन्ही पदें एक केलीं तर कदंबमातंगांचें ऐक्य अधिक दृढ होईल असें युवराजांना वाटत नाहीं काय?

**युव०:**—खरेंच! ही कल्पनाच आमच्या डोक्यांत कधीं आली नाहीं. ठीक आहे. आम्हीं या सूचनेचा जरूर विचार करूं. (कालकूट व हालाहल कंदर्पास घेऊन येतात.) काय? कंदर्प, तुमचें डोकें अद्यापि ठिकाणावर आलें कीं नाहीं?

**कंदर्प:**—माझा मीच जेथें ठिकाणावर नाहीं तर तेथें माझें डोकें आपल्या ठिकाणावर येणार कसें?

**युव०:**—आपणास आपल्या ठिकाणीं आणण्याची आमची उत्कट

इच्छा असतां आपण आपल्या ठिकाणीं येण्यास तयार कां होत नाहीं हेंच आम्हांला समजत नाहीं.

**कंदर्पः**—आपल्या इच्छेवर ही गोष्ट अवलंबून असल्यामुळेंच माझी त्याला तयारी नाहीं.

**युव०ः**—आपल्या सर्व कृतापराधांची क्षमा करून आपलें राज्य आपल्यास परत देण्यास आम्ही तयार असतां केवळ आमच्या इच्छेची सबब पुढें करून तुम्ही आमच्या देणगीचा असा अनादर करीत आहांत हें पाहून आम्हांला अत्यंत खेद होतो.

**कंदर्पः**— त्याला उपाय काय ? दुसऱ्याच्या देणगीचा स्वीकार करणें म्हणजे गुलामगिरीचा फांस गळ्यांत अडकवून घेणें असाच जेथें प्रसंग आहे तेथें असें वागण्याशिवाय गत्यंतरच नाहीं. युवराज—

पद २५–" आलि एवली०–"

**परवशता लांछवीत वीरता ॥**
**स्वरिपुस्नेह करित सकल-हित-विघात ॥ ध्रु० ॥**
**मिरवितां दया । शिरिं भूषणापरी ॥**
**प्राप्त होत लोकिं हीन दीनता ॥ १ ॥**

**युव०ः**—आपल्याला आपल्या राज्याचा वीट आला आहे कीं काय ?

**कंदर्पः**—मला माझ्या राज्याचा वीट येणें कसें शक्य आहे ?

**युव०ः**—मग आपण तें परत कां घेत नाहीं ?

**कंदर्पः**—कारण तें राज्य माझें नाहीं.

**युव०ः**—काय ? हें राज्य आपलें नाहीं ?

**कंदर्प**—नाहीं. हें राज्य माझें नाहीं. जी वस्तु स्वतःच्या पराक्रमानें मीं मिळविलेली नाहीं ती माझी नाहीं असेंच मी समजतों.

**युव०ः**—स्वपराक्रमानें मिळविलेल्या वस्तूंप्रमाणेंच कुलपरंपरेनें प्राप्त झालेल्या वस्तूवरही मनुष्याची सत्ता असूं शकते.

**कंदर्पः**—कुलपरंपरेनें हें राज्य माझ्याकडे होतें तोंपर्यंत त्यावर मी आपली सत्ता मानली आणि गाजविलीही आहे. परंतु आज स्वतःच्या पराक्रमाच्या हक्कानें जसें तें मला प्राप्त होत नाहीं तसेंच तें आज परंपरेच्या

हक्कानेंही माझ्याकडे येत नसून माझ्या व माझ्या देशाच्या दुष्मानाची दया म्हणून तें आज माझ्या पदरांत पडत आहे, आणि दुष्मानाची दया राज्यलक्ष्मीच्या रूपानें जरी प्रगट होत असली तरी तिच्याकडे आपली आशाळभूत नजर टाकण्याला माझें मन मला सांगत नाहीं.

**युव०**:—कंदर्प, पराक्रमाच्या खुळ्या कल्पनेच्या मागें लागून गेलेली राज्यलक्ष्मी परत येत असतां तिचा असा धिक्कार करण्यानें तुम्ही आपल्या सर्वस्वाचा नाश करून घेत आहांत हें तुमच्या लक्षांत कसें येत नाहीं ?

**कंदर्पः**—सर्वस्वनाशांत आणि परक्यांच्या दयेवर पोसल्या जाणाऱ्या पराक्रमशून्य स्वातंत्र्यहीन जीवितांत मला कांहींच फरक दिसत नाहीं.

**युव०**:—कंदर्प, मातंगेश्वराच्या मगरमिठींत सांपडलेलें तुमचें राज्य स्वतःच्या बाहुबलानें तुम्हास परत मिळवितां येईल अशी आशा करावयाला तुम्हाला यत्किंचित् तरी कोठें जागा दिसत आहे काय ?

**कंदर्पः**—होय. पराक्रमाच्या निशेनें धुंद झालेली ही माझी दृष्टि मी जिकडे जिकडे फेंकतों तिकडे तिकडे मला आशेवांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं.

**युव०**:—हा तुमचा भ्रम आहे. स्वपराक्रमानें स्वराज्य फिरून संपादन करणें तर तुम्हाला यापुढें शक्य नाहींच, पण हा पराक्रमाचा हट्ट तुम्ही असाच चालू ठेवल्यास मातंगाधिपतीच्या बंदिवासांतून तुमची मुक्तता होणें सुद्धां तुम्हाला यावज्जन्म शक्य होणार नाहीं. मातंगांच्या बंदिवासांतून मुक्त होऊन कदंबराजसिंहासनावर तुम्हांला निष्कंटकपणें नांदावयाचें असेल तर मातंगेश्वराच्या दयेचा स्वीकार करणें एवढा एकच मार्ग तुम्हांला खुला आहे.

**कंदर्पः**—मातंगांच्या दयेच्या आश्रयानें कदंब-राजसिंहासनावर फिरून पाऊल ठेवण्यास हा कंदर्प प्राणांतींही तयार होणार नाहीं. कदंबाचा राजमुगुट या कंदर्पाच्या मस्तकावर फिरून तळपावयाचा असेल तर तो पराक्रमाचें चिन्ह म्हणूनच तळपला पाहिजे. परक्यांच्या दयेचें लांछन म्हणून तो मस्तकावर कालत्रयीं तळपावयाचा नाहीं. मग या आग्रहापायीं आजन्म बंदिवासच काय पण हें मस्तक फांसावर लटकलें तरी मला त्याची पर्वा नाहीं.

**युव०**:—तुम्ही एक वेळ सोडून दहा वेळ फांसावर लटकावयास तयार

असाल, पण तुमच्या या हट्टीपणामुळें तुमच्या देशाचें किती अपरिमित नुकसान होत आहे याचा तुम्हाला कांहीं विचार करावयास नको काय ?

**कंदर्प:**—माझ्या हट्टामुळें माझ्या देशाचें नुकसान होण्याचें कारण काय ? कदंबाचें राज्य कदंबांना परत देण्याची तुम्हाला जर एवढी उत्कंठाच लागलेली आहे तर तें तुम्ही माझ्या अभावींही त्यांना परत देऊं शकता. आणि कादंबांना या भिकेच्या शिदोरीवर आपली गुजराण करावयाची हौस असेल तर तेही तें सहज तुमच्यापासून घेऊं शकतात. माझ्या हट्टाची अडचण या व्यवहारांत कोठे नडते ?

**युव०:**—कदंबाधिपतीचें राज्य कदंबाधिपतीस परत करावें असा मातंगेश्वरांनीं करार केलेला आहे. कादंबांचें राज्य कादंबांना परत करावें असा करार केलेला नाहीं. मातंगेश्वर राज्य हें राजाचें धन समजतो–लोकांचें धन समजत नाहीं. तेव्हां तुम्ही हें राज्य परत घेत असाल तर तें तुम्हालाच परत मिळेल. नाहीं तर त्याचा मातंग साम्राज्यांत समावेश करणें मातंगाधिपतीस इच्छा नसतांही निरुपायानें भाग पडेल.

**कंदर्प:**—पडूं द्या. खुशाल भाग पडूं द्या. मला त्याची पर्वा नाहीं. मातंगेश्वराचा कृपाप्रसाद म्हणून त्याचा स्वीकार केल्यानेंही गुलामगिरीवांचून जर कशाचाच लाभ होणें शक्य नाहीं तर असल्या अप्रत्यक्ष परंतु अधिक जाचक गुलामगिरीपेक्षां प्रत्यक्ष गुलामगिरी पत्करणें काय वाईट ? बलात्काराची प्रत्यक्ष गुलामगिरी दयेच्या अप्रत्यक्ष गुलामगिरीपेक्षां स्वातंत्र्यसंस्थापनेस अधिक उपकारक आहे. माझी ढाल पुढें करून तिच्या आडून आपली तलवार सही करण्याचा मातंगाधिपतीचा हा डाव आहे. सोहेराचा धनि मातंगेश्वर आणि सुतकाचा खुंट मात्र मी असल्या प्रकारची हास्यास्पद स्थिति गळ्यांत बांधून घेण्याइतका मी मूर्ख नाहीं. ज्याचें पोट माल खाईल त्याचाच पाठीनीं मारही खाल्ला पाहिजे. माल तुम्हाला, मार मला असला अंदरबस्याचा व्यापार यापुढें माझ्या हातून केव्हांही होणार नाहीं.

**युव०:**—तर मग जा. देशद्रोहाचें पातक शिरावर घेऊन मातंगाधिपतीच्या कैदखान्यांत हालअपेष्टा भोगीत जन्मभर खितपत पडा.

**कंदर्प०:**—माझी तयारी आहे.—

पद २६–" खचित ललना० "—

वरिन अधमा दशा सुखें । सदा संसारीं ॥
परि न धरि अरिच्या पदा भालां या ॥ ध्रु० ॥
विफल सुखासुख विचार; मनुजा ॥
शीलचि तारित गहन मोह–माया ॥ १ ॥

**युव०:**—कालकूट याना येथून घेऊन जा. (कालकूट व हालाहल कंदर्पास नेतात.)

**सौदा०:**—काय ? माझे शब्द जेथें फोल ठरले तेथें युवराजांचें वक्तृत्वही कवडीमोलच ठरलें ना ?

**युव०:**—होय--ठरलें खरें. मनुष्यस्वभावाची बाईसाहेबांना इतकी बिनचुक परीक्षा आहे हें पाहून बाईसाहेबांच्या बुद्धीचें आम्हाला मोठें कौतुक वाटतें. पण बाईसाहेब, प्रारंभीं आमच्याशीं विश्वासानें व स्नेहभावानें वागणाऱ्या कंदर्पाच्या वृत्तींत एकदम एवढा जमीनअस्मानचा फरक कसा पडला हें कोडें कांहीं आम्हाला अजून उलगडत नाहीं. आणि त्यांतूनही आपल्यासारख्या चतुर स्त्रीची त्याच्यावर सतत देखरेख असतां त्याच्या उदार अंतःकरणांत कलीचा प्रवेश झालेला पाहून तर आम्हीं अगदीं कुंठित झालों आहोंत.

**सौदा०:**—ही सारी चूक युवराजांची आहे. तेजस्विनीची आणि त्याची गांठ जर युवराजांनीं पडूं दिली नसती तर कंदर्प युवराजांच्या मुठींतून केव्हांच सुटला नसता; पण तें जाऊं द्या. झाल्या गोष्टी होऊन गेल्या. आतां कंदर्पाची शहानिशा संपली. आतां युवराजांनीं माझ्या सूचनेचा विचार करून माझ्या नांवानें द्वाही कां फिरवूं नये ?

**युव०:**—मातंगेश्वरांच्या हुकुमावांचून आम्हाला आमच्या जबाबदारीवर तसें करतां येत नाहीं. शिवाय तेजस्विनीच्या खटल्याचा निकाल लागेपर्यंत कंदर्पाच्याच नांवानें राज्य चालावणें आपणांस जरूर आहे. तथापि आपली सूचना मातंगेश्वरांच्या मंजुरीकरितां पाठविण्याचें मात्र आम्ही बाईसाहेबांना आश्वासन देतों.

**सौदा०:**—नुसतें आश्वासन काय कामाचें ? तें लौकर अमलांत आलें पाहिजे.

**युव०:**—लौकर का ? आतां–या क्षणाला. चला शृगाल, मातंगेश्वराला या एकंदर हकीकतीचा खलिता ताबडतोब खरडून टाकूं व बाईसाहेबांची सूचनाही त्यांच्या कानावर घालूं. असल्या कामाला दिरंगाई उपयोगाची नाहीं. बाईसाहेब, येतो आम्ही. ( दोघे जतात. )

**सौदा०:**—( स्वगत ) शेवटीं मींच मात केली–माझाच डाव सही झाला–मीच सरस ठरल्यें. या मगरूर पुरुषांना, आपल्या बुद्धीची मोठी घमेंड वाटत असते परंतु—

पद–" समाविलं वपुवार०–"

**नारि नरा अनिवार ॥ अपार धरित चतुरता ॥ ध्रु० ॥**
**पौरुष गर्वा तुडवित पायीं ॥ वृथा बला मिरवितां ॥ १ ॥**

जाते.

---

## प्रवेश दुसरा.

( **स्थळ**—कदंब–न्यायसभामंदिर, न्यायाध्यक्ष, सभासद, कालकूट, तेजास्विनी, हालहाल, प्रेक्षक, इत्यादि. )

**न्यायाध्यक्ष:**—( स्थानापन्न झाल्यावर ) प्रधानजी, आरोपीस कोणत्या गुन्ह्याबद्दल न्यायसभेपुढें हजर करण्यांत आलेलें आहे ?

**काल०:**—राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल. कदंबेश्वरांनीं मातंगाधिपतीशीं नुक्ताच जो तह केला, त्याला आरोपीनें स्वतः विरोध केला असून हा तह मान्य करूं नये म्हणून शब्दांनीं, चिन्हांनीं आणि कृतींनीं लोकांना चिथावणी देऊन त्यांच्याकडूनही सदर तहास विरोध करविण्याचा तिनें प्रयत्न केला आहे.

**न्याया०:**—या बाबतींत आरोपीकडून आक्षेपाई अशीं कोणतीं कृत्यें घडलीं ?

**काल०**:—पहिलें कृत्यः—महाराजांची इच्छा मातंगेश्वराशीं तह करण्याची असतां, त्यांना वळविण्याचा व लढाईस प्रवृत्त करण्याचा आरोपीनें यत्न केला.

**न्याया०**:—केव्हां केला ? तहापूर्वीं कीं तहानंतर ?

**काल०**:—तहापूर्वीं.

**न्याया०**:—बरें पुढें ?

**काल०**:—दुसरें कृत्यः—हा यत्न व्हावा म्हणून महाराजांशीं आरोपीचें तिच्या वडिलांकडून आज कैक वर्षांपूर्वीं ठरविण्यांत आलेलें लग्न मोडण्याचा महाराजांस तिनें धाक घातला, व अखेरीस महाराजांनीं मोठ्या प्रेमानें आरोपीच्या करांगुलींत घातलेली प्रणयमुद्रा महाराजांना परत करून तिनें आपलें लग्न मोडलें असें साऱ्या मंत्रिमंडळादेखत महाराजांना बेधडकपणें सांगितलें.

**न्याया०**:—तहापूर्वी कीं नंतर ?

**काल०**:—अर्थात् तहापूर्वी. पण या ठिकाणीं न्यायाध्यक्षांना व न्यायसभेला मला नम्रपणें सुचवून ठेवावयाचें आहे कीं या कांहीं गोष्टी तहापूर्वीं घडलेल्या असल्या तरी त्या महाराजांशीं विरोधात्मक असल्यामुळें त्या राजद्रोही स्वरूपाच्याच आहेत.

**न्याया०**:—त्या गोष्टी कोणत्या स्वरूपाच्या आहेत आणि कोणत्या स्वरूपाच्या नाहींत हें ठरविण्याचें काम न्यायसभेचें आहे, तुमचें नाहीं. तुम्ही फक्त आम्हीं विचारलेल्या प्रश्नांचा खुलासा करा. हं पुढें बोला.

**काल०**:—तिसरें कृत्यः—महाराजांनीं तहनाम्यावर सही केली त्यावेळीं महाराजांचा उपमर्द करून आरोपीनें त्यांचा भरदरबारांत धिक्कार केला. त्यांच्यावर अपशब्दांची आणि शिव्यांची लाखोली वाहिली. चवथें कृत्यः—महाराजांनीं तहनाम्याचा कागद प्रधानजींना म्हणजे अर्थात् मला दाखवून शृगालराजांच्या स्वाधीन केला तेव्हां "मी हा तह अमलांत येऊं देणार नाहीं" अशी आरोपीनें मोठ्या उद्धटपणानें महाराजांना धमकी दिली. पांचवें कृत्यः—नंतर महाराजांनीं आरोपीला हद्दपार करण्याचा हुकूम दिला, तो उद्दामपणानें फेटाळून लावून ती जबरदस्तीनें राजधानींतच

राहिली. सहावें कृत्यः—कदंबाचें निशाण काढून त्या ठिकाणीं मातंगाचें निशाण लावण्यासाठीं महाराज स्वतः प्रतापचौकांतील ध्वजासनासन्निध गेले असतां आरोपीनें आपल्या बंडखोर साथिदारांसह त्या ठिकाणीं त्यांना शाब्दिक व शारीरिक असा दोन्ही प्रकारचा सशस्त्र विरोध केला.—

**१ न्यायसभा०:**—ही यादी या युगांत संपणार आहे का?

**२ न्यायसभा०:**—कां साऱ्यांचा अंत होईपर्यंत हिची लांबण अशीच लांबणार आहे?

**काल०:**—नाहीं. ठोकळ ठोकळ कृत्यांची यादी आतां संपली.

**१ न्यायसभा०:**—आणि आतां किरकोळ कृत्यांची सुरू होणार कीं काय? म्हणजे झालें. खाशा मंडळींनींच आमचा अर्धा प्राण गुदमरून टाकला. आतां शिपाई प्याद्यांची वरदळ सुरू झाली कीं, खटल्याच्या निकालापूर्वी न्यायसभेचाच निकाल लागणार!

**काल०:**—मान्यवर सभासदांनीं असें रागावूं नये. खटला म्हटला कीं, तो खटल्यासारखाच चालला पाहिजे. आणि त्यांतही हा राजद्रोहाचा खटला! तेव्हां त्यांत तर अशी घाई मुळींच कामाची नाहीं. असो. आतांपर्यंत निवेदन केलेलीं एकंदर सहा ठोकळ कृत्यें झालीं. याशिवाय याच मासल्याचीं किरकोळ कृत्यें तर अगणितच आहेत. पण त्यांचा पाढा वाचून मी न्यायसभेच्या काळाचा अपव्यय करूं इच्छित नाहीं.

**२ न्यायसभा०:**—कालकूटांना कालाची दया आली हें पाहून आम्हाला आनंद वाटतो.

**न्याया०:** —झालें तुमचें सारें म्हणणें?

**काल०:**—झालेंच. पण शेवटीं जातां जातां एवढेंच सुचवून ठेवावेसें वाटतें कीं आरोपी स्त्री--आणि त्यांतही अविवाहित कुमारिका असून तिनें पुरुषांनाही लाजविणारें असें हें स्त्रीस्वभावास व स्त्रीधर्मास अनुचित कर्म करून राजाबरोबर धर्माचा आणि साक्षात् परमेश्वराचाही द्रोह केला आहे या गोष्टीकडेही न्यायसभेचें दुर्लक्ष होऊं नये.

**१ न्यायसभा०:**—म्हणजे? न्यायसभा हा मृत्यूचा दरबार आहे कीं

काय, कीं माणसानें केलेल्या यच्चावत् कर्माकर्मांची येथें शहानिशा झालीच पाहिजे ?

**काल०:**—तसा माझ्या म्हणण्याचा रोंख नाहीं. फक्त याही गोष्टीकडे न्यायसभेचें लक्ष असावें एवढीच माझी नम्र सूचना आहे.

**न्याया०:**—ठीक आहे. (तेजस्विनीस) तेजस्विनी, प्रधानजींनीं आतां जी आक्षेपार्ह कृत्यांची लांबलचक यादी वाचून दाखविली तीं कृत्यें तुझ्या हातून खरोखरच घडलेलीं आहेत, का हा तुझ्यावर नुस्ता आळ घेण्यांत येत आहे ?

**तेज०:**—कृत्यांच्या संबंधानेंच बोलावयाचें असल्यास प्रधानजींनीं वाचलेल्या यादींत--आणि न वाचलेल्या यादींत सुद्धां--सत्याचा अपलाप अगर विपर्यास यत्किंचितही करण्यांत आलेला नाहीं, हें मी प्रांजलपणें कबूल करत्यें. त्यांनीं वर्णन केलेलीं आणि न केलेलीं सर्व कृत्यें मजकडून घडलेलीं आहेत. आणि मी आतांपर्यंत मोकळी असत्यें तर याच जातीचीं पण याहूनही अधिक भयंकर म्हणून भासवितां येण्यासारखीं अनेक कृत्यें माझ्या हातून अवश्य घडलीं असतीं, असेंही मी न्यायसभेस स्पष्ट सांगूं इच्छितें. परंतु या सर्व दृश्य अदृश्य कृत्यांचें कर्तृत्व जरी मला सर्वथैव मान्य असलें तरी तीं कृत्यें आक्षेपार्ह आहेत असें जें प्रधानजींचें म्हणणें आहे, तें मात्र मला बिलकुल मान्य नाहीं. या कृत्यांनीं राजद्रोहाचा गुन्हा मी केला आहे असें मला मुळींच वाटत नाहीं; आणि म्हणून प्रधानजीकडून माझ्या माथीं जो राजद्रोहाचा आरोप मारण्यांत आलेला आहे तो मला बिलकुल मान्य नाहीं. मी पूर्ण निरापराधी आहे--निर्दोषी आहे; इतकेंच नव्हे तर राजनिष्ठेच्या परमपवित्र धर्मापासून माझें पाऊल एक रतिमात्रही चळलेलें अगर ढळलेलें नाहीं.

**न्याया०:**—प्रधानजींनीं सांगितलेलीं सर्व कृत्यें तुझ्या हातून घडलीं असल्याचें जर तूं कबूल करत्येस, तर प्रधानजींनीं तुझ्यावर केलेला आरोप खोटा आहे असें तुला कसें म्हणतां येईल ?

तेज०:—न्यायसभेनें मला माझें म्हणणें साविस्तरपणें मांडण्याची परवानगी दिल्यास माझें वर्तन निर्दोषी आहे हें न्यायसभेस निर्विवाद सिद्ध करून देण्यास मी तयार आहे.

**न्याया०**—( इतर सभासदांशीं विचार करून ) तुझें म्हणणें काय आहे तें सविस्तरपणें न्यायसभेपुढें मांडण्याची न्यायसभेची तुला परवानगी आहे.

**काल०:**—( मध्येंच ) माझी या परवानगीला हरकत आहे!

**न्याया०:**—हरकत आहे? काय हरकत आहे?

**काला०:**—आजची परिस्थिति इतकी नाजुक आहे कीं या वेळीं आरोपीला आपलें म्हणणें अशा जाहिर दरबारात सविस्तरपणें मांडण्याची मोकळीक देणें अत्यंत धोक्याचें आहे. आरोपीचा युक्तिवाद म्हणजे मूर्तिमंत राजद्रोहच असणार याबद्दल मला तर यत्किंचितही शंका नाहीच; पण न्यायसभेतील सन्मान्य सभासदांना व खुद्द न्यायाध्यक्षानाही त्याबद्दल संशय असणें शक्य नाहीं. तेव्हां असें भाषण करण्याला आरोपीला परवानगी देणें म्हणजे प्रत्यक्ष न्यायदरबारात राजद्रोहाचें राजरोस प्रदर्शन करणे आहे.

**न्याया०:**—पण आरोपीचें म्हणणे समग्र ऐकून घेतल्यावाचून न्यायसभा खटल्यांचा निकाल कसा करणार?

**काल०:**—न्यायसभेनें वाटल्यास आरोपीचें म्हणणें ऐकून घ्यावें. त्याला माझी मुळींच हरकत नाहीं. परंतु या आमदरबाराला तें ऐकण्याची मनाई करण्यांत यावी.

**प्रेक्षक:**—नाहीं-नाहीं आम्हालाही आरोपीचें म्हणणें काय आहे तें कळलें पाहिजे. कदंबाचा न्यायदरबार सर्वांना खुला आहे तेथें असा चोरटेपणा उपयोगी नाही.

**न्याया०:**—( प्रेक्षकांस ) खटला ऐकण्यासाठीं जमलेल्या सर्व लोकांना न्यायसभेच्या वतीनें मी अशी नम्र सूचना करितों कीं त्यांनीं सभेंत आरडाओरड करून गांभीर्याचा भंग करूं नये.

**प्रेक्षक:**—ठीक आहे. आम्ही स्वस्थ बसतों. परंतु तेजास्विनीबाईचें म्हणणें काय आहे तें आम्हांलाही कळेल अशी न्यायाध्यक्षांनीं व्यवस्था करावी अशी आमचीही न्यायसभेला नम्र विनंति आहे. सर्व व्यवहार खुलेपणानें चालावा असा कदंब न्यायसभेचा आजवरचा शिरस्ता आहे.

**न्याया०:**—आपण शांत रहा. आजवरचा शिरस्ता मोडून कदंब

राजसभेंत चोरटेपणाचा असा एकही कारभार होणार नाहीं असें मी आपणांस न्यायसभेच्या वतीनें आश्वासन देतों. (तेज०स) तेजस्विनी, सांग तुझें काय म्हणणें आहे तें.

**काल०:**—म्हणजे ? मी केलेली विनंति न्यायसभेला मान्य नाहीं असें मी समजावयाचें कीं काय ?

**न्याया०:**—होय. आपली विनंति न्यायसभेला न्यायास अनुसरून मान्य करतां येत नाहीं.

**काल०:**—पण न्यायसभेच्या या अव्यवहारिक वर्तनाचा भलताच परिणाम झाला तर जबाबदार कोण ?

**न्याया०:**—तेजस्विनीचें म्हणणें न्याय्य नसेल तर त्याचा विपरीत परिणाम होण्याची भीति बाळगण्याचें कारण नाहीं; आणि न्याय्य असेल तर होईल तो परिणाम विपरीत मानण्याचें कारण नाहीं.

**काल०:**—( विचारपूर्वक ) न्यायसभेचा असाच अभिप्राय असेल तर आजच्या परिस्थितींत खटला पुढें चालूं नये अशी मी न्यायसभेस विनंति करतों.

**न्याया०:**—(इतर सभासदांशीं विचार करून) आपली विनंति न्यायसभेस संमत नाहीं. खटला आज पुढें चाललाच पाहिजे आणि याचा निकालही आजच लागला पाहिजे असा न्यायसभेचा स्पष्ट अभिप्राय आहे.

**काल०:**—तर मग या बाबतींत युवराजांची काय आज्ञा आहे याचा खुलासा होईपर्यंत काम तहकूब ठेवण्यांत यावें अशी मी सूचना करतों.

**न्याया०:**—कदंबाचें राज्य मातंग साम्राज्यांत अद्यापि सामील करण्यांत आलें नसल्याकारणानें मातंग युवराजांना कदंब न्यायसभेच्या कामांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार पोहोंचत नाहीं हें आपणांस माहीत नाहीं काय ?

**काल०:**—न्यायाध्यक्षांचें हें विधान न्यायसभेस मान्य आहे काय ?

**न्यायसभा:**—होय. आम्हांला हें विधान पूर्ण मान्य आहे. मातंग युवराजांना कदंबन्यायसभेच्या कामांत हात घालण्याचा बिलकुल अधिकार नाहीं, असा आमचा स्पष्ट अभिप्राय आहे.

**काल०:**—कदंबाचें राज्य मातंग साम्राज्यांत सामील करण्यांत आलेलें

नसलें तरी तें युवराजांनीं आज जिंकलेलें आहे; आणि या पुढें त्याचें अस्तित्व कायम रहाणें न राहणें हें मातंग युवराजांच्या इच्छेवरच सर्वस्वी अवलंबून आहे. तेव्हां न्यायसभेला आपल्या देशाच्या स्वातंत्र्याची व अस्तित्वाची कांहीं चाड असल्यास तिनें आपलें धोरण व वर्तन मातंग युवराजांच्या मर्जीप्रमाणेंच ठेवलें पाहिजे, असें माझें तिला नम्रपणाचें पण आग्रहाचें सांगणें आहे.

**न्यायसभाः**—मातंग युवराजांच्या मर्जीबरहुकूम कदंब न्यायसभेला नाचणें भाग असेल तर हीं न्यायासनें आणि आपण, खुशाल वाटेल तो गोंधळ घाला. आम्हांला या खटल्याची कांहीं जरूरी नाहीं.

**काल०ः**—तर मग हा प्रकार मला युवराजांच्या कानावर ताबडतोब घातलाच पाहिजे. हालाहल, इकडे या. ( त्याच्या कानांत कांहीं सांगतो. )

**हाला०ः**—( हळूंच आश्चर्यानें ) काय म्हणतां ? सर्व ठीक चाललें आहे म्हणून सांगूं ?

**काल०ः**—( हळूंच ) होय. सर्व बरोबर चाललें आहे, असें सांगा.

**हाला०ः**—नवल आहे. येथें एवढी हमरीतुमरी चाललेली असतां, ' बरोबर आहे ' असें मी युवराजांना खोटेंच कसें सांगूं ? मी लष्करी शिस्तीचा माणूस आहे. पहावयाचें एक आणि सांगावयाचें दुसरेंच, अशी लबाडी मला साधणार नाहीं.

**काल०ः**—( रागानें हळूंच ) कसें मूर्ख आहांत हो तुम्ही ? हें खरें भांडण नसून भांडणाचें लटकें नाटक आहे हें तुम्हांला ठाऊक नाहीं काय ?

**हाला०ः**—( हळूंच ) खरेंच. माझ्या लक्षांतच राहिलें नाहीं. हें मला वाटलें तुमचें खरेंच भांडण जुंपलें आहे. मी लष्करी शिस्तीचा माणूस. तुम्हा मुत्सद्द्यांचे लपंडाव माझ्या डफर डोक्यांत शिरत नाहींत. आतां जातों मी. ( जातो. )

**काल०ः**—( न्यायसभेस मोठ्यानें ) आतां यापुढें या खटल्यांत कांहींच बोलण्याची माझी इच्छा नाहीं. न्यायसभा आपल्या या अदूरदर्शित्वाबद्दल सर्वस्वी जबाबदार आहे !

**न्याया०ः**—न्यायसभा आपली जबाबदारी पूर्ण ओळखूनच वागत आहे.

तेव्हां आपण त्याबद्दल बिलकुल चिंता करूं नका. (तेजास्विनीस) तेजस्विनी, तुला बोलण्याला आतां परवानगी आहे.

**तेज०:**—न्यायाध्यक्ष व न्यायसभेंतील सभासदहो, प्रधान कालकूट आणि आपण या उभयतांमध्यें आतां जो वादविवाद झाला त्यावरून मला आपलें भाषण चितक्या लौकर आटोपतां येईल तितक्या लौकर आटोपणें भाग आहे.

**न्याया०:**—बरोबर आहे; आपण जितकें लौकर आटोपेल तितकं चांगलें.

**काल०:**—पण त्यापेक्षां मुळींच न केलेलें काय वाईट ! खटल्याच्या निकालाला त्याची कांहीं आता विशष जरुरी नाहीं. न्यायासभेनें आपला निर्णय आधींच लावून ठेविलेला आहे.

**१ न्या० सभा०:**—ही न्यायसभेची बेअदबी होत आहे.

**न्याया०:**—आतां निष्कारण मधेंच बोलून आरोपीचा वेळ घेऊं नका. ( तेजस्विनीस ) तेजस्विनी, चल–चालू दे.

**तेज०:**—परमपूज्य न्यायाध्यक्ष व न्यायसभेंतील मान्यवर सभासदहो, परमेश्वराच्या कृपेनें आपण सर्वांनीं कदंबन्यायसभेचें स्वतंत्र अस्तित्व कायम ठेवलेंत, हें पाहून मला मोठा आनद व अभिमान वाटत आहे, व या आपल्या स्पृहणीय स्वाभिमानपूर्ण वर्तनाबद्दल मी आपणा सर्वांस अंतःकरणपूर्वक धन्यवाद देतें. राजद्रोहासारख्या भयंकर गुन्ह्याच्या खटल्यांत आपल्या एका भगिनीला निरपेक्ष बुद्धीनें व निर्भय चित्तानें न्याय देण्यासाठीं अवश्य असणारें मनाचें पावित्र्य व सामर्थ्य आपल्या ठिकाणीं पूर्णत्वानें वास करीत आहे अशी माझी पक्की खात्री आहे. माझ्या देशबांधवांकडून माझ्याच देशाच्या कायद्यानुसार माझी चौकशी करविण्याचे साहस करण्यांत प्रतिपक्षाचा कोणताही गूढ–अंतस्थ हेतु असला तरी या न्यायसभेची सत्ता मान्य करून इच्यापुढें आरोपी म्हणून उभी रहाण्यास व तिच्यापुढें आपली बाजू मांडण्यास मी तयार झाल्यें, ती केवळ माझ्या देशाच्या न्यायसभेकडून न्यायाची पायमल्ली होणें केव्हांही शक्य नाहीं अशा दृढ श्रद्धेमुळेंच तयार झाल्यें. या सभेवर माझ्या देशाच्या कायद्यांहून इतरांची सत्ता चालू झाली आहे असं मला समजतें तर या सभेपुढें उभी रहाण्याचा सुद्धां मी साफ इन्कार केला असता. आणि न्यायाचें ढोंग माजविण्यासाठीं माझ्या

प्रतिपक्षानें जबरदस्तीनें मला इच्छेपुढें उभें केलेंच असतें, तर स्वतःच्या बचावासाठीं एक शब्दही तोंडावाटे उच्चारला नसता. कदाचित् दुर्दैवानें ही माझी श्रद्धा–हा माझा विश्वास--अस्थानीं व निष्फल ठरेल. परंतु तो तसा ठरला तरी माझ्या देशबांधवांकडून मला झालेला अन्याय मी मोठ्या आनंदानें मान्य करीन.

**काल०:**—( मध्येंच ) छे–छे–अन्यायाची भीति बाळगण्याचें तुला आतां मुळींच कारण नाहीं. तुझ्या प्रिय देशबांधवांची मर्जी यावेळीं तुझ्या-वर बालंबाल बहाल आहे.

**तेज०:**—न्यायाध्यक्ष व न्यायसभेंतील सभासदहो, राजद्रोहाच्या आरोपा-वरून मला आपल्यापुढें हजर करण्यांत आलें आहे; व या आरोपाच्या पुष्टीकरणार्थ माझ्या हातून घडलेल्या अनेक आक्षेपार्ह कृत्यांचा लांबलचक पाढाही आपणासमोर वाचून दाखविण्यांत आला आहे. या सर्व कृत्यांची जबाबदारी मी पहिल्यानेंच आपल्या शिरावर घेतली असून ती मी केव्हांही नाकबूल करण्यास तयार नाहीं. तेव्हां आतां आपणापुढें एवढाच प्रश्न आहे कीं हीं माझीं कृत्यें न्यायतः राजद्रोहात्मक आहेत कीं काय ? माझ्या प्रतिपक्षास तीं राजद्रोहात्मक दिसतात; पण मला त्यांत राजद्रोहाचा लवलेशही दृष्टीस पडत नाहीं. इतकेंच नव्हे, तर, तीं पूर्ण राजनिष्ठात्मक आहेत असें माझें म्हणणें आहे. नुस्तें राजाचें नांव धारण करून कांहीं कोणी राजा होत नाहीं. गुलाबाच्या चित्रांनीं सुगंध दरवळत नाहीं; सिंहाच्या पुतळ्यांनीं वनप्रांत हादरत नाहीं; किंवा नौका या शब्दानें परतीर गांठतां येत नाहीं. त्याप्रमाणें राजाच्या नांवाची नुस्ती पाटी कपाळावर लावल्यानें अंगांत राजत्वाचाही उदय होत नाहीं. न्यायसभेंतील सन्मान्य सभासदहो, हीच गोष्ट मुख्यत्वें-करून मला प्रथम आपल्या नजरेस आणावयाची आहे. ज्याचा द्रोह केल्या-मुळें माझ्यावर राजद्रोहाचा गुन्हा लावण्यांत येत आहे–तो नादान इसम आपणांस राजा म्हणवीत असला तरी तो खरोखर राजा नाहीं–इतकेंच नव्हे तर ‘ राजा ’ हें परमपवित्र अभिधान धारण करण्यासही तो तिळमात्र लायक नाहीं.—

**काल०:**—( मध्येंच ) राजद्रोह–राजद्रोह. न्यायाध्यक्ष, हा धडधडीत राजद्रोह होत आहे. आपण हें भाषण तावडतोब बंद करवा.

**न्याया०:**—आपण निष्कारण मध्यें अडथळा कां करतां ? भाषण जर राजद्रोही असेल, तर त्याचें प्रायश्चित्त आरोपीस अखेरीस भोगावेंच लागेल.

**काल०:**—अखेरीस भोगावें लागेल. पण आधीं आमची प्रायश्चित्ताची वेळ येईल त्याची वाट काय ?

**न्याया०:**—आपण अगदीं निर्धास्त असा. कदंबन्यायदरबारांत कोणाच्याही केंसाला धक्का लागावयाचा नाहीं.

**काल०:**—ठीक आहे. चालूं द्या तुमची दांडगाई. मी आतां मध्यें एक अक्षरही तोंडावाटें काढीत नाहीं. पण याचा परिणाम न्यायसभेस लौकरच भोगल्यावांचून रहाणार नाहीं एवढें मात्र बजावून ठेवतों.

**न्याया०:**—तेजस्विनी, चालूं दे पुढें.

**तेज०:**—या नादान-नालायक-तोतयानें थोड्या दिवसांपूर्वीं मातंगेश्वराशीं एक अत्यंत दुष्ट व नीचपणाचा तह करून कदंबाची राजसत्ता-कदंबाची राजलक्ष्मी—कदंबाचें राजसिंहासन—कदंबाचा राजमुगुट—कदंबाचा राजध्वज—थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे कदंबाचें राजसर्वस्व मातंगेश्वरास अर्पण केलें; आणि स्वतः राज्यहीन व ऐश्वर्यहीन बनून आपल्या पूज्य मातृभूमीच्या पायांत पारतंत्र्याच्या शृंखला अडकवून अखिल कदंबराष्ट्रास गुलामगिरीच्या नरकांत ढकलून दिलें. हा तह कदंबाच्या राजसत्तेला आणि राष्ट्रस्वातंत्र्याला धुळीस मिळविणारा असल्यामुळें—आणि त्यांतही असला राजसत्तेला व राष्ट्रस्वातंत्र्याला परम विघातक तह प्रजाजनांच्या संमतीवांचून घडवून आणण्याचा घाट कंदर्पानें घातल्यामुळें मी त्यापूर्वीं व नंतर त्यास कसून विरोध केला—करीत आहें आणि शक्य झाल्यास या देहांत जीव असेपर्यंत पुढेंही केल्यावांचून रहाणार नाहीं.

**काल०:**—( पुनः मध्येंच ) राजद्रोह—राजद्रोह ! काय करावें ? भयंकर राजद्रोह ! !

**तेज०:**—आणि या माझ्या शास्त्रशुद्ध विरोधालाच—राजद्रोह—भयंकर राजद्रोह—असें माझ्या प्रतिपक्षानें नांव दिलेलें आहे. खरें पाहिलें तर राजा हा फक्त प्रजेचा पालनकर्ता—सर्व श्रेष्ठ अधिकारी आहे व त्यानें यावद्देह प्रजेचें पालन करावें एवढाच त्याचा अधिकार व धर्म आहे. प्रजेचा क्रयविक्रय करण्याचा अगर परक्यांच्या पायांवर तिच्या स्वातंत्र्याचा बळि

देण्याचा त्याला बिलकुल अधिकार नाहीं व तो त्याचा धर्म तर नाहींच नाहीं. परचक्रापासून आपल्या देशाचें व राष्ट्राचें संरक्षण करण्याचें त्याच्या अंगीं सामर्थ्य नसेल तर त्यानें आपल्या अधिकाराचा संन्यास करून आपलें राजसिंहासन व आपला राजदंड आपल्या प्रजेच्या स्वाधीन करावा व आपल्या जबाबदारींतून मोकळें व्हावें. परंतु कोणत्याही बाबतींत प्रजेच्या पूर्ण संमतिवांचून तिच्या स्वातंत्र्याचें उदक परक्याच्या हातावर सोडण्याचा त्यास बिलकुल अखत्यार पोहोंतच नाहीं. तह होण्यापूर्वी ही गोष्ट मी कंदर्पास सांगितली व त्यानें आपल्या अधिकाराचा दुरतिक्रम करूं नये म्हणून परोपरीनें त्याला विनाविलें, परंतु मातंगांच्या गुप्त मलिद्यावर पोसलेल्या देशद्रोही विश्वासघातकी स्वार्थलंपट प्रधानमंडळाच्या विथावणीस फसून, त्यानें माझें म्हणणें धुडकावून लावलें.

काल०:—( ओरडत ) बदनामी–बेइज्जत–बेअब्रू–न्यायाध्यक्ष, ही प्रधानमंडळाची बदनामी–बेइज्जत–बेअब्रू होत आहे.

तेज०:—होय. ही प्रधानमंडळाची बदनामी–बेइज्जत बेअब्रूच आहे; आणि मी ती जाणूनबुजून मुद्दाम करीत आहें. कदंबाच्या सर्वस्वनाशास कारण होणारा हा भयंकर तह करण्याची बदसल्ला प्रधानमंडळाकडून कंदर्पाला देण्यांत आली, तिच्या मुळाशीं मातंगांच्या द्रव्याचा झरा वाहत होता ही माझी बालंबाल खात्री पटलेली आहे आणि प्रसंग पडल्यास मी ती न्यायसभेस पुराव्यानिशीं शाबीत करून देण्यास तयार आहें. प्रधानमंडळाची हिंमत असल्यास या राजद्रोहाच्या खटल्याबरोबर आपल्या बेअब्रूचाही खटला त्यानें मजवर भरावा. माझी त्याला तयारी आहे. परंतु तोंपर्यंत मी प्रधानमंडळाला स्पष्ट बजावून सांगत्यें कीं वेळ येईल तेव्हां, माझ्या भाषणांत मी त्याला " मातंगांच्या गुप्त मलिद्यावर पोसलेली देशद्रोही चांडाळचौकडी " याच नांवानें संबोधणार–कमी करणार नाहीं. न्यायाध्यक्ष व न्यायसभेंतील सभासदहो, माझी विनंति—माझी प्रार्थना—माझा जिव्हाळयाच्या प्रेमाचा आग्रह जेव्हां कंदर्पानें झुगारला व मातंगेश्वराच्या–कदंबाच्या परंपरागत कट्टया दुश्मानाच्या–पायावर आपलें व आपल्या राष्ट्राचें सर्वस्व अर्पण करण्यास जेव्हां तो तयार झाला. तेव्हां माझ्या परमप्रिय राष्ट्रदेवतेची एक सेविका या नात्यानें मला त्याचा विरोध करणें प्राप्त

झालें. परंतु मीं विरोध केला असला तरी तो कंदर्पाचा केला; राजाचा केला नाहीं. आणि असें असूनही मला राजद्रोही म्हणून पकडून आपणासमोर शिक्षा ठोठावण्यासाठीं उभें करण्यांत आलें आहे. न्यायाध्यक्ष व न्याय-सभेंतील सभासदहो, मी जर खरोखर राजद्रोह केला असतां तर तुम्ही आपल्या राजसत्तेचें परचक्रापासून व अंतस्थ विश्वासघातापासून रक्षण करा, असें लोकांना मीं कां सांगितलें असतें ? मी जर खरोखर राजद्रोह केला असतां तर आपल्या राजसिंहासनाला परक्याच्या पापी पायांचा स्पर्श होऊं देऊं नका, असा मी आपल्या देशबांधवांच्या कानाशीं गगनाचा भेद करणारा प्रचंड टाहो कां फोडला असता ?—मी जर खरोखर राजद्रोह केला असता तर कदंब-राजध्वजाचा उपमर्द केला जाऊं नये म्हणून आपणांस धोक्यांत घालून घेण्याचें आत्मघातकी साहस करण्यास मी प्रवृत्त कां झालें असतें ? राजसत्तेचें राजसिंहासनाचें- राजध्वजाचें संरक्षण करण्यास स्वतः सिद्ध होणें आणि इतरांस तसा उपदेश करणें याची राजद्रोहांत गणना कशी होऊं शकते ?—राजसिंहासन राजदंड—राजध्वज हे राजसत्तचे अलंकार असूनही राजसत्ता ही राजाची साक्षात् जीवनकला आहे. ती नाहीं म्हणजे राजाचें अस्तित्वच नाहीं. राजसत्तेवांचून राजा ही शब्दाची हत्या—भाषेचा खून आहे. एवढेंच नव्हे तर हा प्रत्यक्ष सत्याचा अक्षम्य विपर्यास आहे ! जीवनावांचून जीव, अगर जलावांचून जलाशय—त्याप्रमाणें सत्तेवांचून राजा हा शब्दप्रयोग केवळ फोल आहे. सत्तेच्या त्यागानंतर राजाचें राजेपण क्षिल्लक रहात नाहीं. आत्म्यानें सोडलेल्या कुडीची जशी माती बनते, तशीच सत्तेनें टाकलेल्या राजाचीही मातीच बनते. कंदर्पानें आपलें राज्य परक्यांच्या पदरांत टाकल्यामुळें तो मातीमोलच झाला होता—त्याच्या अंगीं राजत्वाचा लेशही शिल्लक राहिला नव्हता. त्यामुळें सत्ताहीन- राज्यहीन—राजैश्वर्यहीन बनलेल्या पुरुषाच्या विरोधाला अगर वैमनस्याला राजद्रोही हें नांव देणें म्हणजे जगाच्याच नव्हे तर जगदीशाच्या डोळ्यांत धूळ टाकणें आहे. तथापि न्यायाध्यक्ष आणि न्यायसभेंतील सभासदहो, राजसत्ताहीन कंदर्पाला राजा मानलें व त्याच्या विरोधाला राजद्रोह मानिलें तरी सुद्धां तुम्ही मला गुन्हेगार ठरवूं शकत नाहीं. कारण सत्ताशून्य कंदर्पाचासुद्धां मी द्रोह केलेला नाहीं. त्याला मी त्याच्या हिताचीच गोष्ट सांगत



**न्यायाध्यक्षः**—तेजस्विनी निर्दोषी आहे!-- (पान १४७).

होत्यें. राजाला "तूं आपलें राजेपण कायम ठेव व जसा तूं आजपर्यंत राजा होतास तसाच पुढेंही राजाच रहा" असें सांगणें, हा त्याचा द्रोह होतो काय ? किंवा "तुमचा राजा परक्यांचा गुलाम होऊं पाहात आहे–किंबहुना झाला आहे त्याला गुलामगिरींतून सोडवून पुनः गुलामाचा पूर्ववत् राजा बनवा" असें मी कदंबांना सांगितलें यांत मी राजाचा द्रोह केला काय ? ज्यांनीं आपल्या राजाला गुलाम बनविण्याचा घाट घातला ते राजद्रोही का जे गुलामांच्या मालिकेंत जाऊन बसलेल्या आपल्या हतभागी असाहाय्य राजाला पुनः त्याच्या गत राजसिंहासनावर पूर्ववत् पूर्ण ऐश्वर्यानें स्थापन करण्यास झटले व झटत आहेत, ते राजद्रोही ? कंदर्पानें आपलें राज्य राखण्याची हिंमत बाळगली असती तर त्याच्या राजत्वाच्या रक्षाणासाठीं मीं आपले स्वतःचे प्राण बळी दिले असते व माझ्या देशबांधवानाही त्याच्या सेवेप्रीत्यर्थ आपल्या प्राणाचें बलिदान करण्याचा उपदेश केला असता. इतकेंच नव्हे तर आजही कंदर्प आपलें राजेपण कायम राखण्यासाठी परदास्याच्या शृंखला तोडण्यास तयार होईल तर त्याच्या प्रीत्यर्थ आपल्या सर्वस्वाचा यज्ञ करण्यास माझी सिद्धता आहे. मला कंदर्प नको आहे असें नाहीं–तर मला गुलाम कंदर्प नको आहे–मला राजा कंदर्प हवा आहे. मी द्रोह केलाच असेल तर तो गुलाम होऊं पहाणाऱ्या व गुलाम झालेल्या कंदर्पाचा द्रोह केला आहे–राजा कंदर्पाचा केला नाहीं. राजा कदर्पाचा मी अजूनही प्रजाजन आहें–सेवक आहें आणि त्याच्यासाठीं समरांगणावर आपल्या पंचप्राणांची खैरात करण्यास माझी या क्षणासही तयारी आहे. न्यायाध्यक्ष आणि न्यायसभेंतील समासदहो, राजा हें परमपवित्र नांव धारण करणारी व्यक्ति व राजा या शब्दानें प्रकट होणारें तत्त्व या दोहोंमध्यें असणारा भेद आपण या खटल्यांत अवश्य लक्षांत घेतला पाहिजे. राजा हें उपपद धारण करणाऱ्या व्यक्ति वारंवार बदलणाऱ्या आहेत; परंतु राजा या शब्दानें व्यक्त होणारा भाव केव्हांही बदलणारा नाहीं. तो शाश्वत आहे, त्रिकालाबाधित आहे. आणि त्या भावाच्या प्रत्यक्ष अस्तित्वामुळेंच राजा हें नांव धारण करणाऱ्या व्यक्तीला जगांत श्रेष्ठपद प्राप्त झालेलें आहे. तेव्हां जेथें व्यक्ति आणि तत्त्व यांत विरोध उत्पन्न झाला आहे, अशा आजच्यासारख्या विलक्षण स्वरूपाच्या राज-

द्रोहाच्या खटल्यांत आपण अशाश्वतांपेक्षां शाश्वतालाच अधिक महत्त्व दिलें पाहिजे. आजचा प्रश्न केवळ एखाद्या व्यक्तीला न्यायदान करण्याचा नसून एका परमश्रेष्ठ दिव्य तत्त्वाच्या प्रस्थापनेचा प्रश्न आहे. आणि या तत्त्वाच्या प्रस्थापनेवरच तुमच्या राष्ट्राचें भवितव्य अवलंबून आहे. कंदर्प या व्यक्तीचा कैवार घेऊन तुम्ही राजतत्त्वाचा या वेळीं धिक्कार कराल तर स्वदेशाच्या गळ्याभोंवतीं गुलामगिरीचा पाश आवळण्याचें पाप तुमच्या माथीं बसल्यावांचून राहणार नाहीं. व्यक्तिनिष्ठेवर भर देऊन तत्त्वनिष्ठेचा त्याग केल्यामुळेंच आजवर अनेक राष्ट्रें लयास गेलीं आहेत व आज त्यांचें नांव–निशाणही जगाच्या पाठीवर उरलेलें नाहीं. न्यायाध्यक्ष आणि न्यायसभेंतील सभासदहो, आपण विद्वान् आहांत–विचारी आहांत–आणि इतिहासाचें, समाजनीतिशास्त्राचें व कायद्याचें आपणांस पूर्ण ज्ञान आहे. त्याचप्रमाणें आपल्या ठिकाणीं उज्ज्वल न्यायनिष्ठा व निस्सीम स्वातंत्र्यप्रेम जागृत आहेत. तेव्हां स्वतःचा जीव बचावण्यासाठीं परक्यांच्या सिंहासनापुढें तुमच्या राजसत्तेचा बळी देऊन तुमच्या वैभवशाली स्वातंत्र्यलक्ष्मीला परकीयांच्या अंतःपुरांत जबरदस्तीनें कोंडणाऱ्या स्वधर्मभ्रष्ट नराधमाचा द्रोह म्हणजे राजद्रोह आहे अशी जर तुमची खरोखर प्रामाणिक समजूत असेल तर तो मीं अवश्य केला आहे; आणि त्याबद्दल दोषी ठरवून आपण मला खुशाल सुळावर चढवा, मी त्यास मोठ्या आनंदानें तयार आहें. ज्या कदंब राजसिंहासनासाठीं तुमच्या वाडवडिलांनीं आपल्या अमृताच्या मोलानें खपणाऱ्या रक्ताची समरदेवतेच्या मस्तकावर तिला प्रसन्न करण्यासाठीं, गेलीं दोनतीन तपें संतत धार धरली होती, तें तुमचें राजसिंहासन तुमच्या परंपरागत कट्टया दुष्मानाच्या पापी चरणस्पर्शानें भ्रष्ट करविणाऱ्या विश्वासघातकी महापातक्याचा विरोध करणें हा राजद्रोह आहे असें जर तुमची मनोदेवता तुम्हांस निश्चयानें सांगत असेल तर हे कदंब राजसिंहासनाशीं एकनिष्ठ असणाऱ्या कदंब लोकनायकांनो, माझ्या हातून तो निःसंशय झालेला आहे, आणि त्याबद्दल गुन्हेगार ठरवून आपण मला खुशाल हत्तीच्या पायाखालीं तुडवून टाकण्याची शिक्षा द्या-ती भोगण्याला मी मोठ्या आनंदानें तयार आहें. न्यायाध्यक्ष आणि न्यायसभेंतील मान्यवर सभासदहो, आपल्या कृत्यांचे होतील ते परिणाम भोगण्याच्या तयारीनेंच मीं या स्वातं-

त्र्यसंग्रामांत उडी घेतली आहे. तेव्हां आपणाकडून मला देहान्तशासन सांगण्यांत आलें तरी मला त्याची यत्किंचितही फिकीर वाटत नाहीं. तेव्हां मला आपणांस जी शेवटची विनंति करावयाची आहे ती हीच कीं, आपण ज्या पुण्यभूमींत जन्मास आलां आहांत तिचे जगांत धिंडवडे करून पुत्रपौत्रांच्या शिव्याशापांना आपण पात्र होऊं नका. कदंबाची न्यायसभा म्हणजे स्वातंत्र्यलक्ष्मीचें पवित्र क्रीडामंदिर आहे. आणि प्रजाजनांचें स्वातंत्र्य-संरक्षण करण्याचा या न्यायसभेचा आजवरचा बाणा आहे. मी आपणापाशीं दयेची याचना करीत नाहीं–प्राणांची याचना करीत नाहीं. मला आपणा-पासून फक्त न्यायाची अपेक्षा आहे आणि तो न्याय स्वातंत्र्याच्या परमश्रेष्ठ तत्त्वावर अधिष्ठित झालेला असावा एवढीच माझी इच्छा आहे. परमेश्वर करो आणि असा ईश्वरी न्याय मला आपणाकडून मिळो अशी माझी परमे-श्वरापाशीं प्रार्थना आहे.

**न्याया०:**—तेजस्विनी, संपलें तुझें भाषण ? का तुला आणखी कांहीं सांगावयाचें आहे ?

**तेज०:**—नाहीं. मला आणखी कांहीं सांगावयाचें नाहीं.

**न्याया०:**—ठीक आहे. सभासदहो, चला आंतल्या बाजूस.

(न्यायाध्यक्ष व सभासद आंत जातात.)

**१ सेना०:**—भाषण फारच सुंदर झालें नाहीं ?

**२ सेना०:**—सुंदर झालें खरें. पण या फत्तरांच्या मनावर त्याचा कांहीं परिणाम झाला असेल, असें मला वाटत नाहीं.

**३ सेना०:**—आणि झाला असला तरी त्याचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. तेजस्विनीला देहान्तशासन करण्याबद्दल मातंगयुवराजांनीं न्यायसभेला सक्त ताकीद दिली आहे अशी मला खात्रीलायक बातमी कळली आहे.

(एक मुख्य सेना० येतो. त्याच्याशीं कुजबुजतात.)

**१ सेना०:**—सेनापतिसाहेब, पुढचा हुकूम काय ?

**मु० सेना:०**—ठरला बेत कायम.

**२ सेना०:**—निकाल विरुद्ध झाला तरी ?

**मु० सेना०:**—होय.

**काल०:**—सेनापति, आपापसांत काय कुजबुजत आहांत ?

**मु० सेना०:**—पुढच्या बंदोबस्तासंबंधानें यांना सूचना देत आहें.

**काल०:**—लोकांचा काय रागरंग दिसतो ?

**मु० सेना०:** —लोक तेजस्विनीच्या मुक्ततेची अत्यंत उत्सुकतेनें वाट पहात आहेत. एवढें लांबलचक भाषण करण्याला तिला परवानगी द्यावयास नको होती. त्याचा लोकांवर फार भयंकर परिणाम झाला आहे.

**काल०:**-- दंगा होण्याचा रंग दिसतो कीं काय ?

**मु० सेना:**—होय. आणि एवढ्याचसाठीं मी प्रधानजीकडे आलों आहें. दंगा झाल्यास-आणि तेजस्विनीस शिक्षा झाल्यावर तो होणारच— तेव्हां लोकांवर हत्यार चालविण्याला आम्हांला परवानगी पाहिजे.

**काल०:**—माझी सदर परवानगी आहे. मातंगसैन्याची मदत पाहिजे असल्यास युवराजांना कळवितो.

**मु० सेना०:**—छे-त्यांचें कांहीं कारण नाहीं. आम्हीं करूं शकूं सारा बंदोबस्त. पण पुढें मागें आमच्यावर कांहीं तोहमत येऊं नये, एवढेंच आमचें म्हणणें आहे.

**काल०:**—त्याबद्दल तुम्ही अगदीं बेफिकीर असा. पण हें पहा, निकाल लागतांच तेजस्विनीला एकदम येथून तुरुंगांत नेण्याची मात्र चांगली व्यवस्था असूं द्या.

**मु० सेना०**—ती सर्व चोख व्यवस्था आहे. शिक्षेची सुनावणी झाली कीं, केलीच तिची उचलबांगडी म्हणून समजा. पण ते पहा न्यायाध्यक्ष व सभासद आले, मी जातों बाहेर.

( जातो ).

( न्यायाध्यक्ष व सभा० परत येतात. सर्वत्र शांतता. )

**न्याया०:**—तेजस्विनी, तुझ्यावर करण्यांत आलेले आरोप व तूं केलेलें आत्मसमर्थन या दोहोंचाही न्यायसभेनें अत्यत काळजीपूर्वक विचार करून आपला निर्णय ठरविला आहे. तुझें भाषण अत्यंत वक्तृत्वपूर्ण झालें. असें अंतःकरणास थरारून सोडणारें ओजस्वी भाषण या न्यायसभेच्या मंदिरांत हें पहिल्यानेंच ऐकण्यांत आलेलें आहे. लोकोत्तर बुद्धिवैभव व निरुपमेय स्वातंत्र्य,-प्रेम यांचा हें भाषण म्हणजे उत्कृष्ट नमुना आहे. हें ऐकल्यानंतर तुल राजद्रोहाबद्दल दोषी ठरविणें म्हणजे न्यायाचा प्रत्यक्ष खून पाडण्यासारखेंच

आहे. तथापि देशाची आजची परिस्थिति इतकी विलक्षण आहे कीं, निर्भेळ न्यायदानाच्या प्रसंगीं सुद्धां या परिस्थितीकडे यत्किंचितही दुर्लक्ष करणें म्हणजे स्वदेशघाताच पातक माथीं मारून घेणेंच आहे. म्हणून तुला न्याय देतांना त्याचा देशाच्या हिताहितावर काय परिणाम होईल याचा विचार करूनच न्यायसभेला आपला निर्णय ठरविणें प्राप्त आहे. तुला निर्दोषी ठरविल्यानें जर कदंब राष्ट्रास अपाय पोहोंचण्याची भीति असेल तर स्वदेशहिताच्या निरपेक्ष दृष्टीनें न्यायाचा कांटा पूर्ण समतोल ठेवणें न्यायसभेस शक्य होणार नाहीं. त्याचप्रमाणें तुला दोषी ठरविल्यानें जर देशाची हानि होण्याचा संभव असेल तर न्यायानें तूं दोषी ठरत असलीस तरी देशहिताच्या एकैक दृष्टीनें तुला दोषमुक्त करण्यावांचून न्यायसभेस आज गत्यंतर नाहीं. तेव्हा या खटल्यांत निर्णय देताना न्यायापेक्षा स्वदेशहिताकडेच अधिक लक्ष पुरविण्याचा न्यायसभेचा निश्चय झालेला आहे. न्यायास दयेची जोड असावी असा शास्त्राचा सिद्धान्त आहे. परंतु तुला स्वतःलाच दयेची अपेक्षा नसल्यामुळें व देशहिताच्या दृष्टीनें ती न्यायसभेस दाखवितां येईलच अशीही खात्री नसल्यामुळें दयेच्या प्रश्नास आम्ही आपल्या निर्णयात मुळींच अवकाश ठेविलेला नाही. केवळ न्यायाच्याच दृष्टीनें तुझ्या कृत्यांचा निःपक्षपातपणे विचार केल्यास तीं राजद्रोहात्मक आहेत असें सत्यास स्मरून न्यायसभेस कदाचित् म्हणतां यावयाचें नाहीं. राजगुणसंपन्न राजा व राजगुणहीन राजा या दोहोंमध्यें तूं दाखविलेला फरक खरोखरच विचारणीय आहे. त्याचप्रमाणें प्रजेचें स्वातंत्र्य प्रजेच्या संमतीवांचून परक्यांच्या हवालीं करण्याचा राजाला हक्क पोहोंचतो किंवा नाही या संबंधानें तूं केलेलें प्रतिपादन तितकेंच महत्त्वाचें व चिंतनीय आहे. व्यक्ति आणि तत्त्व यांमध्यें व्यक्तीपेक्षां तत्त्वास अधिक महत्त्व देण्यासंबंधानें तूं केलेला आग्रहही न्यायसभेस सर्वथैव मान्य होण्यासारखाच आहे. आणि या सर्वांपेक्षांही "आपलें सिंहासन परक्याच्या स्वाधीन करून तूं परक्यांचा गुलाम होऊं नकोस" असा जिव्हाळ्याचा आग्रह राजाला करणें म्हणजे राजद्रोह होऊंच शकत नाहीं हा तुझा युक्तिवाद तर न्यायसभेस इतका बिनतोड वाटत आहे कीं तो मान्य करण्यावांचून व तुझ्या उत्कट व निःसीम राजनिष्ठेबद्दल तुला धन्यवाद देण्यावांचून गत्यंतरच नाहीं असा न्यायसभेचा स्पष्ट अभिप्राय

आहे. परंतु तुझे हे सर्व युक्तिवाद सत्य, आदरणीय व अनुकरणीय आहेत असें घटकाभर धरून चाललें तरी त्यांचा स्वीकार केल्यानें देशाच्या आजच्या बिकट परिस्थितीवर त्याचे काय परिणाम होतील हें पाहिल्यावांचून निभाव लागावयाचा नाहीं. न्यायसभेनें मुख्यत्वेंकरून ही स्वदेशहितसंरक्षणाचीच विचारसरणी दृष्टीपुढें ठेवून आपला निर्णय ठरविला आहे. स्वदेशहिताच्या दृष्टीनें तुला निर्दोषी ठरवून मोकळी सोडणें हें परिणामीं अनर्थावह ठरल्यावांचून राहाणार नाहीं अशी पुष्कळ शहाण्या देशहितेच्छूंच्या मनाची खात्री होऊन चुकलेली आहे. आणि त्यांच्या मतास मान द्यावयाचा असल्यास तुला दोषी ठरवून देहान्तशासन देणेंच न्यायसभेस युक्त आहे. परंतु इतर पुष्कळ शहाण्या व देशहितेच्छु पंडितांचें याच्या अगदीं उलट मत आहे. त्यांच्या मतें तुला दोषमुक्त करून सोडून देणें हेंच देशहिताच्या दृष्टीनें युक्तच नव्हे तर अत्यावश्य आहे. मी आणि माझ्या सहकारी मित्रांनीं या दोनही मतांचा पूर्ण कसोशीनें विचार करून आपला निकाल मुकरर केलेला आहे. आमचा निकाल पुष्कळांस पसंत पडणार नाहीं व ते आमच्यावर क्रुद्ध होतील हें आम्ही पूर्ण जाणून आहोंत. इतकेंच नव्हे तर या आमच्या निर्णयामुळें माझ्या व माझ्या सहकारी मित्रांच्या जीवितालाही प्रसंगविशेषीं धोका होण्याचा संभव आहे, याचीही आम्हांला पूर्ण जाणीव आहे. कारण अशा प्रकारचा आम्हांला स्पष्ट इशाराच देण्यांत आलेला आहे. तथापि ज्या परम पवित्र व परम श्रेष्ठ न्यायासनावर आम्ही आरूढ झालों आहोंत त्याचें निर्मल यश अभंग ठेवण्याचा आम्हीं कृतनिश्चय केलेला असल्यामुळें असल्या इषाऱ्यांना आम्ही कवडीचीही किंमत देऊं इच्छित नाहीं. लोकांच्या कोपाला आमचे प्राण बळी पडले तरी बेहेत्तर; परंतु कादंबन्यायदेवतेच्या उज्ज्वल यशाला काळिमा फांसण्यास आम्ही केव्हांही तयार होणार नाहीं. तेव्हां तेजस्विनी, कालकूट व सभासज्जनहो, आपण आमचा निर्णय शांतचित्तानें ऐका.—ईश्वरास, धर्मास व देशास स्मरून कादंबन्यायदेवतेचा यशोदुंदुभि जगांत सदैव गाजत राहावा म्हणून केवळ राष्ट्रहिताच्या एकैक दृष्टीनें या न्यायसभेच्या नांवानें या राजद्रोहाच्या खटल्याचा आम्ही असा निर्णय जाहीर करतों कीं, या खटल्यांत तेजस्विनी निर्दोषी आहे निरपराधी आहे—निष्कलंक आहे. [एकदम सर्वत्र हर्षाची आरोळी उठते.]

**काल०**:—( धक्का बसून ) काय–काय ? तेजस्विनी निर्दोषी आहे ?–निरपराधी आहे ?–निष्कलंक आहे ?—

**न्याया०**:–होय. तेजस्विनी पूर्ण निर्दोषी आहे–पूर्ण निरपराधी आहे. पूर्ण निष्कलंक आहे आणि यापुढें स्वतंत्रपणें वावरण्याचा तिला पूर्ण हक्क आहे.

**काल०**:—( चवताळून ) अरेरे–चांडाळांनो हें काय केलेंत तुम्हीं ? मातंग युवराजांच्या पायाशीं कालच केलेल्या शपथांचा तुम्हांला आज पार विसर पडला आं !

**न्याया०**:—शत्रूच्या पायाशीं केलेल्या शपथा तत्काळ विसरून जाण्यासाठींच केलेल्या असतात. ( न्यायाध्यक्ष व न्यायसभासद निघून जातात ). ( हालाहल प्र. क. )

**हाला०**:—प्रधानजी-घात झाला-कंदर्प कैदेंतून पळाला.–(जयजयकार).

**काल०**:—काय ? कंदर्प पळाला ? अरेरे–कंदर्प पळाला–तेजस्विनी सुटली. मोठा बिकट प्रसंग आला. पण आधीं त्या दगबाजांना एकदम कैद करा आणि तेजस्विनीला तावडतोब तुरुंगांत नेऊन पोहोंचवा. पकडा–पकडा–त्या हरामखोरांना.–( पूर्वोक्त मुख्य सेनापति व सैनिक लगबगीनें प्रवेश करितात. )

**मु० सेना०**:—नाहीं–नाहीं–न्यायसभेंतील सभासद कैद केले जाणार नाहींत व तेजस्विनीला पुन: तुरुंगाचा मार्ग पाहावा लागणार नाहीं. (तेजस्विनीचा व न्यायसभेचा जयजयकार )

**काल०**:—म्हणजे ?–म्हणजे ?–तुमच्या म्हणण्याचा अर्थ तरी काय ?

**मु० सेना०**:—कादंब सैन्यानें आजपासून स्वातंत्र्ययुद्धाचें निशाण उभारलें असून आपलें आधिपत्य तेजस्विनीला अर्पण केलें आहे. ( तेजस्विनीस ) ताईसाहेब, कादंब सैन्याची ही तरवार त्याच्या वतीनें मी आपल्या पायांवर अर्पण करीत आहें. ( तसें करतो. जयजयकार ).

**काल० व हाला०**:—बंड-बंड-बंड !–(ओरडत पळून जाऊं लागतात.)

**मु० सेना०**:—पकडा-पकडा हरामखोरांना–पळून जाऊं देऊं नका.–(दोघांस पकडतात. तेज० व न्याय०चा जयजयकार). —पडदा पडतो.

**अंक चौथा समाप्त.**

# अंक पांचवा.



## प्रवेश पहिला.

( स्थळः-राजवाडा. शृगाल व सौदामिनी प्रवेश करतात. )

**सौदा०:**—( रागानें ) तें कांहीं नाहीं. मला तुमचें एक अक्षरसुद्धां आतां ऐकावयाचें नाही. मातंगाचें युवराज्ञीपद मला देण्याचें तुम्हीं कबूल केलेंत—त्याचा अजून कोठें पत्ता नाहीं. नुसतें माझें प्रेमाराधनसुद्धां युवराज मनापासून करीत नाहींत. बरें कदंबाचें राज्य देतों म्हणून म्हणतां पण तेंही अजून माझ्या पदरांत पडत नाही. कंदर्पाचा नकार मिळूं दे—तेजस्विनीचा खटला संपूं दे—कादंबांचें बंड मोडूं दे--अशी रोजच्या रोज कांहींना कांही तरी सबब सांगून तुम्ही माझा प्रश्न सारखा लांबणीवर टाकीत आहात. पण आतां मी तुमची ही टोलवाटोलवी क्षणभरसुद्धां चालूं देणार नाहीं. कादंबांचा पराजय होऊन तेजास्विनी आजच्या लढाईंत तुमच्या हातांत सांपडली आहे. तेव्हां आजच्या आज कादंबांची राणी म्हणून माझ्या नावाची द्वाही तुम्ही फिरविलीच पाहिजे. नाहींतर मी पाणी पिण्याला सुद्धां येथें थांबणार नाहीं. साफ सांगत्यें.

**शृगालः**—राणीसाहेबांनीं एकदम असा त्रागा करूं नये. इतके दिवस गेले तसे आणखी चार दिवस कांहीं जास्त नाहींत. कंदर्प कैदेंतून निसटला आहे तो पकडला गेला म्हणजे कदंब-राजसिंहासनावर आपली स्थापना झालीच म्हणून समजा.

**सौदा०:**—छे. मी आतां कोणतीही सबब ऐकण्यास तयार नाहीं. कंदर्प सांपडो अगर न सांपडो मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. तेजास्विनी पकडली गेली आहे-कादंबांचा पुरा मोड झाला आहे.बस्. आतां कदंबाचें राज्य आपल्या वचनाला स्मरून तुम्ही या क्षणीं माझ्या स्वाधीन केलें पाहिजे. नाहींतर आम्हाला आमचें वचन पाळावयाचें नाहीं म्हणून मला स्पष्ट सांगितलें पाहिजे. याशिवाय तिसरी गोष्ट मला आतां नको. तुमच्या आतांपर्यंतच्या वर्तनावरून

तुमच्या मनांत माझ्याविषयीं पाप आलें आहे अशी मला जबरदस्त शंका येऊं लागली आहे. तेव्हां जा—आतांच्या आतां युवराजांकडे जा आणि त्यांचा काय तो रोखठोक जबाब घेऊन या. म्हणजे पुढचा मार्ग मला मोकळा होईल. हुरळली मेंढी लागली लांडग्याच्या मागें अशी माझी स्थिति झाली आहे.

शृगाल:—राणीसाहेब, आमच्यावर निष्कारण आग पाखडीत आहेत हें पाहून मला अत्यंत खेद होत आहे. पण असो. मी युवराजांना भेटून आतांच या प्रश्नाचा अखेरचा निकाल लावून टाकतो. ( पाहून ) अरे पण ते पहा—युवराजच इकडे येत आहेत. तेव्हां आतां राणीसाहेबांनीं स्वत:च त्यांना काय सांगावयाचें तें सांगावें आणि आपला निकाल लावून घ्यावा. ( युवराज येतो ).

युव०:—शृगाल, तेजास्विनी आपला हट्ट सोडून कादंबांना शरणागताची सल्ला देण्यास तयार होत नाहीं. तेव्हां उद्यां दोन प्रहरपर्यंत कादंब दातीं तृण धरून आम्हांला शरल आले नाहींत तर तेजास्विनीला तोफेच्या तोंडीं दिली जाईल असा कादंब महासभेच्या अध्यक्षाला आतांच्या आतां निर्वाणीचा संदेश पाठवा.

शृगाल:—जशी सरकारांची आज्ञा. सरकारांनीं बाईसाहेबांच्या प्रश्नाचा आतां निकाल लावून टाकावा.

युव०:—तेंच ठरवून आम्ही इकडे आलों आहोंत. कादंबांचा आतां पुरा मोड झाला आहे. तेव्हां हा प्रश्न आतां अधिक लांबणीवर टाकण्यांत अर्थ नाहीं. संदेश पाठवून आपण ताबडतोब इकडे परत या. तोंपर्यंत आम्ही बाईसाहेबांशीं याबाबत थोडेसें बोलतों. ( शृगाल जातो ). काय ? बाईसाहेब, ठीक चाललें आहे ?

सौदा०:—बाईसाहेब ! तेजास्विनी तोफेच्या तोंडीं जाण्याची वेळ आली तरी मी अजून बाईसाहेबच का ? ‘ राणीसाहेब ’ नाहीं ?

युव०:—छे—राणीसाहेब होण्याचा योग या जन्मीं तरी आपल्या नाशिबीं आहे असें कांहीं आम्हांला वाटत नाहीं.

सौदा०—म्हणजे आपल्याला आपलें वचन पाळावयाचें नाहीं वाटतें !

युव०:—आपण आपलें वचन पाळलें असतें तर आम्हालाही आमचें

वचन पाळणें भागच होतें. पण आपण आपलें वचन पाळलें नाहीं. आमच्याशीं अप्रामाणिकपणानें वागलांत–कपट केलेंत–प्रतारणा केलीत.

**सौदा०**:—काय! मी आपणांशीं अप्रामाणिकपणानें वागल्यें–कपट केलें–प्रतारणा केली !—

**युव०**:—होय. आपण आमच्याशीं दगलबाजी केलीत–आमचा विश्वासघात केलांत.—

**सौदा०**:—काय दगलबाजी केली ? कोणता विश्वासघात केला ?

**युव०**:—काय दगलबाजी केली ? कोणता विश्वासघात केला ? सौदामिनी, कंदर्पाला आमच्याविरुद्ध चिथावून त्याचा आमचा स्नेह कोणी तोडविला ? आणि राज्यदानाची शर्त त्याच्याकडून कोणी मोडविली ? आम्ही अत्यंत सायासानें कादंब-मातंगांचें ऐक्य घडवून आणलें–आणि चांडाळणी तूं त्यांत विष कालविलेंस !—आमच्या सर्व सत्य–संकल्पांचा नाश केलास !

**सौदा०**:—मीं कंदर्पाचा स्नेह तोडला ? मीं राज्यदानाची शर्त मोडविली ? मीं कादंब–मातंगांच्या ऐक्यांत विष कालविलें ?—

**युव०**:–होय–तूंच–तूंच ही सर्व बदमाषी केलीस. शांततेचा भंग केलास–युद्धाचा वणवा पेटविलास व या दुर्भागी कदंबराष्ट्रास धुळीला मिळाविलेस.

**सौदा०**:—कशावरून म्हणतां आपण हें ?

**युव०**:—आमच्याजवळ सबळ पुरावा आहे.

**सौदा०**:—पुरावा आहे ! दाखवा कोठें आहे तो–

**युव०**:—शिशुपाल–पशुपाल–( दोघे येतास ).

**सौदा०**:—कोण ? शिशुपाल–पशुपाल !—

**युव०**:—होय. शिशुपाल–पशुपाल. यांनींच आम्हांला तुझ्या कारस्थानाची पहिल्यानें बातमी दिली.

**सौदा०**:—हे लबाड आहेत–पाजी आहेत.—

**युव०**:—ते लबाड पाजी आहेत का तूं लबाड पाजी आहेस याचा आतांच निकाल लागेल. जरा थांब. ( शृगाल प्र. क. ).

**शृगालः**:—सरकार,कादंबांच्या अध्यक्षांना हुकुमाप्रमाणें संदेश पाठविला.

**सौदा०**:—शृगाल, युवराज माझ्यावर दगलबाजीचा आरोप करीत

आहेत. तहांतील शर्ती मोडावयाला मीं कंदर्पाला चिथविलें असें त्यांचें म्हणणें आहे.

**शृगालः**---मग ? त्यांत खोटें काय आहे ?

**सौदा०:**---म्हणजे ? तुम्हीसुद्धां युवराजांचीच बाजू घेतां काय ?

**शृगालः**---सत्याची बाजू कोणीही घेईल.

**सौदा०:**---म्हणजे ? युवराजांची बाजू सत्य आहे वाटतें ?

**शृगालः**---म्हणजे यांत कांहीं संशय आहे वाटतें ? शिशुपाल, पशुपाल, त्याबद्दल आपली खात्री पटवून देतील.

**सौदा०:**---कायरे ए लफंग्यांनो, तुम्ही माझ्याविरुद्ध युवराजांना काय सांगितलेंत ?

**शिशु०:**---जें खरें होतें तें सांगितलें.---

**पशु०:**---जें खोटें होतें तें मुळींच सांगितलें नाहीं-भोलेनाथ !

**सौदा०:**---युवराजांविरुद्ध कंदर्पाला मीं चिथविलें ?

**शिशु०:**---बेशक-आपणच चिथविलें.

**पशु०:**---बेलाशक-आपणच चिथविलें. नांदत्या घरावर निखारे ठेवण्याची अवदसा सटवाईवांचून कोणाला आठवणार ? भोलेनाथ !

**सौदा०:**---तुम्ही साफ खोटें बोलत आहांत.---

**शिशु०:**---आम्हांला खोटें बोलण्याचें कारण ? खोटें बोलून आम्हांला कांहीं कदंबाचें राज्य दडपावयाचें नाहीं.---

**पशु०:**---अगर युवराजाशीं लग्नाआधीं पाट लावावयाचा नाहीं. स्वतः खोटेपणा करून दुसऱ्याला खोटें म्हणण्याची बाईसाहेबांना थोडी तरी शरम वाटावयाला पाहिजे होती. नकटें तें नकटें आणि पुनः नाकाचा डौल. भोलेनाथ !

**सौदा०:**---मेल्यांनो, तुम्ही माझा अखेरीस दावा साधलांत आं !

**शिशु०:**---कां साधूं नये ? लुचपतीचा पैसा साराच्या सारा स्वतःच हडप करून आमच्या तोंडाला पानें पुसतांना तुम्हांला तरी आमची कदर थोडीच वाटली होती ?

**पशु०:**---एक दिवस सासूचा तर एक दिवस सुनेचा. आतां तडफडून

काय उपयोग ? हंस्त केलें तें रडत भोगलेंच पाहिजे. चालत्या काळांतलीं पापें पालथ्या काळांत अशींच बोकांडीस बसत असतात--भोलेनाथ !

**युव०**:—पटला का पुरावा ?

**सौदा०**:—हा पुरावा कसला ? हें सारें थोतांड आहे. तुम्हांला कदंबाचें राज्य गिळंकृत करावयाचें आहे म्हणून तुम्ही असे सर्पासारखे माझ्यावर उलटले आहांत.

**शिशु०**:—वाः काय पण कांगावखोरपणा चालविला आहे !

**पशु०**:—खाऊन खायची आणि वर नकटीची आण वहावयाची. चांगला सोदेगिरीचा धंदा आहे. भोलेनाथ !

**सौदा०**:—ठीक आहे. पाहून घेईन. तुम्ही माझा असा केसानें गळा कापलांत याचा बदला घेतल्याशिवाय मी कधींही सोडणार नाहीं.

( जाऊं लागते ).

**युव०**:—थांब. चाललीस कोठें ? ( तिला धरतो ).

**सौदा०**:—नाहीं–मी आतां येथें एक क्षणभरही थांबणार नाहीं. तुम्ही मला फसविलेंत–बुडविलेंत–तुडविलेंत. आतां तुमच्या संगतींत राहाण्याची मला बिलकूल इच्छा नाहीं.

**युव०**:—आतां तुझ्या इच्छेचा प्रश्नच राहिला नाहीं. आतां आमच्या इच्छेचा–आमच्या हुकुमाचा प्रश्न आहे.

**सौदा०**:—मी कांहीं तुमच्या हुकुमाची ताबेदार नाहीं.

**युव०**:—ताबेदार नसलोस तरी आमची गुन्हेगार आहेस—आमची गिरफदार आहेस. कोण आहे रे तिकडे ? ( शिपायी प्र० क० ) या सट-वीच्या मुसक्या आवळा. ( शिपायी तसें करितात ).

**सौदा०**:—युवराज,—

पद. सोहनी–त्रिताल. बोलोबोलो०–

**वृथा मन वाहिलें या पायीं ॥ स्वदेशनाशा करुनि वरियलें ॥ शापताप छल; फल न तया कांहीं ॥ ध्रु०॥ करिते जरि का जनपदसेवा ॥ घात न होता असा कदाहि ॥ १ ॥**



**तेजस्विनीः**—स्वातंत्र्यवीराच्या नांवानें प्राप्त होणारें वैधव्य मंगल सौभाग्यच आहे. (पान १६०)

**युव०:**—आमच्यासाठीं तूं स्वदेशाच्या गळ्याला फांस लाविलास आणि स्वतःसाठीं आमच्या गळ्याला फांस लाविलास. आम्हीच होतों म्हणून तुझ्या या कपटजालांतून सहीसलामत बाहेर पडलों. दुसरा कोणी लेंचापेंचा असता तर तूं त्याला केव्हांच दाढेखालीं साफ रगडून टाकलें असतेंस. स्वदेशद्रोह्यांना आपल्या पापाचें फळ भोगलेंच पाहिजे. चला, इला घेऊन जा आणि नीट बंदोबस्तांत ठेवा. राजद्रोहाच्या अपराधाबद्दल इला आम्ही फांशीची शिक्षा फर्माविली आहे.

**सौदा०:**—राजद्रोहाचा आरोप-फाशीची शिक्षा! अरे देवा-माझा सर्वस्वी घात झाला!

**शिशु०:**—आतां देवाच्या नांवानें खडे फोडण्यात अर्थ काय?

**पशु०:**—तुझा भावी देव आतां आंधळा-बहिरा आणि मुका, एवढेंच नव्हे तर लंगडा आणि थोटा सुद्धां झाला आहे. तो आतां तुझें कांहीं एक ऐकणार नाहीं आणि तुझ्याकरितां कांहीं एक करणार नाहीं. तुझ्यासारख्या वटवाघुळाला इधरसेभि लाथ आणि उधरसेभि लाथ हेंच बक्षिस योग्य आहे समजलीस. भोलेनाथ!

**शृगाल:**—घेऊन चला इला येथून.

**सौदा०:**—( जातां जातां ) देव तुम्हां सर्वांचें तळपट उडवील.

( शिपायी तिला नेतात ).

**शिशु०:**—चला जा. कावळ्याच्या शापानें कांहीं गाई मरत नाहींत.

**पशु०:**—आणि गाईच्या शापानें कावळेही मरत नाहींत. भोलेनाथ!

**युव०:**—शिशुपाल, पशुपाल तुम्ही आज आमची उत्तम कामगिरी बजावलीत.

**दोघे:**—कामगिरी कसली? सरकारांच्या चरणाची सेवा आहे.

**युव०:**—तेव्हां या तुमच्या कामगिरीबद्दल आम्ही तुम्हांला आजपासून मातंग-दरबारचे सरदार केलें आहे.

**दोघे:**—ही सरकारांची गरिबांवर मोठी मेहेरबानी आहे.

**शृगाल:**—सरदार शिशुपाल-

**शिशु०:**—वकीलसाहेब-

**शृगाल:**—सरदार पशुपाल-

**पशु०**:—श्रीमान् वकीलसाहेब–

**शृगालः**—सरदार या नात्यानें युवराजांना सलामी द्या.

**दोघेः**—( मुजरा करून ) मातंग युवराजांचा जयजयकार असो !

**युव०**:—चला शृगाल, आपल्याला आतां पुढच्या व्यवस्थेला लागलें पाहिजे. सरदारसाहेब, येतो आम्ही. ( दोघे जातात ).

**शिशु०**:—दोस्त, अखेरीस आपणच चोरावर मोर ठरलों !

**पशु०**:—ठरलोंच पाहिजे. अरे हें डोकें आहे का गुडगुडी आहे? अशा एकेक अजब शकला यांत खेंचून भरल्या आहेत कीं त्या पाहून ब्रह्मदेवाची अक्कल सुद्धां गुंग होऊन जाईल. भोलेनाथ !

**शिशु०**:—सौदामिनीला सडकून शिव्या द्यावयाला सांपडल्या याबद्दल मला खूप आनंद झाला आहे.

**पशु०**:—मला सुद्धां झाला आहे. खरें विचारशील तर मी आणखी पांचपन्नास शिव्या हांसडणार होतों. पण काय करावें? मला शिव्या आठवूं लागावयाला आणि ती येथून निघून जावयाला एकच गांठ पडली. त्यामुळें माझा अगदीं विरस झाला. पण जाऊं दे. झाली एवढी सरबत्ती कांहीं कमी नाहीं. चल. आतां या नव्या मिळालेल्या मानाबद्दल आपण एकमेकांना एकमेकांच्या खर्चानें एक टोलेजंग मेजवानी देऊं. भोलेनाथ !

—जातात.

---

## प्रवेश दुसरा.

( प्रतापचौकांतील ध्वजासन. ध्वजासनावर मातंगांचें निशाण फडकत असून भोंवतालीं तोफा ठेवलेल्या आहेत व जवळ युवराज, शृगाल, शिशुपाल, पशुपाल व सैनिक उभे आहेत. )

**युव०**:—अखेरीस कादंबही तेजस्विनीप्रमाणें दुराग्रहीच ठरले व त्यांनीं आमच्याशीं आज फिरून युद्ध सुरू केलें. ठीक आहे. आजच्या लढाईत त्यांना पार नेस्तनाबूद केल्यावांचून अन्न ग्रहण करावयाचें नाहीं असा आम्हीं निश्चय केला आहे.

**शृगाल:**—सरकारांचा निश्चय पार पडणार यांत मला बिलकुल शंका वाटत नाहीं. आतांपर्यंत मातंगांनीं कादंबांचा भयंकर संहार उडविला आहे आणि मातंगांची तलवार अशीच आणखी घटका दोन घटका बेगुमान चालली तर कादंबांचें नांवनिशाण सुद्धां जगाच्या पाठीवर राहणार नाहीं.

**शिशु०:**—बेशक राहणार नाहीं.–आजच्या लढाईत कादंब एक शरण तरी आले पाहिजेत. नाहींतर पार नाहींसे तरी झाले पाहिजेत.

**पशु०:**—नाहींसेच होणार. अगदीं बेशक–बेलाशक–बेधडक नाहींसेच होणार. शरण येण्याची त्यांची आतां छातीच नाहीं. भोलेनाथ !

**युव०:**—शृगाल तेजस्विनीला आणवा. (शृगाल तेजस्विनीस आणवितो). तेजस्विनी, तुझ्या हट्टामुळें आज पुनः युद्धाची धुमश्चक्री सुरू झाली आहे.

**तेज०:**—मला आनंद होतो हें ऐकून.

**युव०:**—आनंद होतो ?

**तेज०:**—होय. आनंद होतो. मी शत्रूच्या हातांत सांडपले असतांही माझें कार्य माझ्यामागें जिवंत आहे ही आनंदाचीच गोष्ट आहे.

**युव०:**—तेजस्विनी, हा कदंबाच्या जीविताचा अखेरचा क्षण आहे.

**तेज०:**—मला वाटतें हा कदंबाच्या आपत्तीचा अखेरचा क्षण आहे.

**युव०:**—ही तुझी भूल आहे. शरणागति पत्करून कादंब आज आम्हांला शरण आले नाहींत तर त्यांच्या कपाळीं सर्वस्वनाश लिहिला आहे ही खात्री ठेव.

**तेज०:**—युवराज हा तुम्हांला भ्रम आहे.–

पद–मालकंस–झपताला. " कृष्णमुखचंद्र. "

**दिव्य स्वातंत्र्यरवि आत्मतेजोबलें ॥**
**प्रगटतां अवनितलिं कोण त्या लोपवी ? ॥ ध्रु० ॥**
**शौर्यसागर–लहरि गगन–मंडल महा ॥**
**भेदितां कवण त्या अबल कर थोपवी ? ॥ १ ॥**

**युव०:**—ठीक आहे. पाहूं ये काय होतें तें. (एक सैनिक लगबगीनें प्रवेश करतो.)

**१ सैनिकः**—सरकार–घात–घात–चला—लौकर चला–जलद चला लढाईचा रंग बदलला—

**शृगालः**—लढाईचा रंग बदलला ?

**१ सैनिक**—होय. रंग बदलला–विजयश्रीनें कादंबांकडे तोंड फिरविलें कादंबांना कुमक आली.—

**युव०ः**—कुमक आली ? कोणाची ?

**१ सैनिकः**—जंगली लोकांची.

**युव०ः**—जंगली लोकांची ? कोण जंगली लोक ?

**१ सैनिकः**—तें कांहीं सांगतां येत नाहीं.

**युव०ः**—किती लोक आहेत ते ?

**१ सैनिकः**—किती म्हणून काय विचारतां ? नुस्तें पेंव फुटल्यासारखें झालें आहे. ते लढाईंत सामील झाल्यापासून कादंबांना भयंकर आवेश चढला असून त्यांनीं आपल्यावर एकामागून एक असे सारखे निकराचे हल्ले चढविण्यास सुरुवात केली आहे. तेव्हां सरकारांनीं लौकर तिकडे चलावें–नाहींतर आपल्या लोकांचा दम सुटून ते लढाईतून पळ काढतील.

**युव०ः**—शृगाल, आम्ही क्षणमात्र लढाईच्या जागीं जाऊन येतों. तुम्ही हें निशाण सांभाळा. आमच्या मनांत हिला मारावयाचें नव्हतें. परंतु लढाई अंगलट येईल कीं काय अशी आमच्या मनास शंका वाटूं लागली आहे. तेव्हां आतां हिला तोफेच्या तोंडीं आवळल्याशिवाय आम्हांला गत्यंतरच राहिलें नाहीं. तुम्ही तोफ भरून तयार ठेवा आणि आमचा इषारा मिळतांच तोफेच्या तोंडी बांधून इचा अखेरचा निकाल लावून टाका. ( जाऊं लागतो ).

**शिशु०ः**—( पशुपालास हळूंच ) आतां काय करावयाचें ?–

**पशु०ः**—आतां गनिमी कावा. संधि सांपडतांच पोबारा–भोलेनाथ !

( हळूं हळूं निघून जातात. शिपाई तेज०स तोफेच्या तोंडी बांधतात).

**युव०ः**—( पाहून ) अरे पण हें काय ? आमच्या लोकांनीं पळ काढलाच वाटतें. शृगाल, इला तोफेला आवळा. ( कांहीं मातंग सैन्य पळत येतात त्यांना अडवून ) बेहिंमती–नामर्द–हरामखोर ! पळतां कोठें ? फिरा

मागें. तुमचे बाप तिकडे मरून पडले आणि तुम्ही पळून चाललांत! कांहीं शरम वाटतें का नाहीं?-शिपायी आहांत का हिजडे आहांत? फिरवा तोंडें.-आतां फिरून मागें वळलांत तर छाटून टाकले जाल.-चला--माझ्या-बरोबर. लढाईंत शिरा.--( जाऊं लागतो तोच कादंब शिपायी, जंगली लोक व त्यांचा नाईक जयजयकार करीत प्र. क. )

**नाईकः**—उन्मत्त सैताना, थांब--पुढें कोठें चाललास? येथेंच आमच्याशीं दोन हात कर आणि आपला पराक्रम काय आहे तो दाखीव.—( युवराजावर चाल करून जातो ).

**युव०:**—हे- जंगली लांडग्या--पुढें सरूं नकोस--आपला हात आवर.

**नाईकः**—तुझ्या प्राणाचा बळी घेतल्यावांचून माझी तरवार म्यानांत शिरणार नाहीं.

**युव०:**—मूर्खा, माझ्या प्राणांची आशा धरशील तर तें पहा--तें दृश्य. ( तोफेस बांधलेल्या तेजस्विनीकडे बोट दाखवितो) हाताच्या एका इषाऱ्या-सरशीं तेजस्विनीच्या चिंधड्या उडविल्या जातील.

**नाईकः**—( पाहून ) अरे देवा-( थांबतो ).—

**युव०:**—विचार कसला करतोस? तरवार खालीं ठेव आणि माझ्या पायाशीं तेजस्विनीच्या व स्वतःच्या प्राणांची याचना कर.

**तेज०:**—( मोठ्यानें ) वीरा नको--नको. भलत्या मोहास बळी पडूं नकोस. मी मेलें तरी पर्वा नाहीं. आपली विजयी तरवार बिनदिक्कत चालीव या वेळीं माझ्यापेक्षां जयाची किंमत जास्त आहे. सर--पुढें सर--शत्रूवर वार कर--आणि जयश्रीला शत्रूपासून हिरावून घे.

**नाईकः**—( स्वगत ) मना भांबवूं नकोस. स्थिर रहा. ( विचार करून उघड ) युवराज--चल घे ही माझी तरवार. मी तुझ्या पायावर ठेवण्यास तयार आहे. तूं आपली तरवार म्यान कर.

**युव०:**—( तरवार म्यान करून ) ही माझी तरवार मीं म्यान केली.-ठेव तुझी तरवार माझ्या पायाशीं.-

**नाईकः**—ही घे आणि तेजस्विनीला मोकळी कर.-

( तरवार खालीं ठेवण्याच्या मिषानें पुढें सरतो ).

**तेज०**:—( दुःखानें ) अरेरे—माझ्या मोहांत गुंतून अखेरीस कदंबाचा घात केलास !

**नाईकः**—सैताना—( एकदम वार करून युवराजाला खालीं पाडतो व त्याच्या छातीवर पाय ठेवून उभा रहातो ). ( कादंबांस ) कादंबांनो, तेजस्विनीला सोडवा.—( कादंब सैनिक तेजास्विनीला सोडवूं लागतात. ) ( जयजयकार ).

**युव०**:—अरेरे—दगलबाजा—दगा केलास.—

**नाईकः**—दगलबाज दुश्मानाला दग्यानेंच मारला पाहिजे. युवराजा, नरकलोकच्या हद्दींत पाऊल टाकण्यापूर्वी तुझ्या छातीवर पाय ठेवून उभा असलेल्या या तुझ्या कट्टया दुश्मानाची ओळख करून घे.—( तोंडावरचा बुरखा काढतो ).

**युव०**:—कोण ? कंदर्प !—

**कंदर्पः**—होय. कंदर्प—तुझा दुश्मन—तुझा काळ. चांडाळा कादंब—राजसिंहासनाचा उपमर्द केल्याचें प्रायश्चित्त भोग.—( त्याच्या छातींत तरवार खुपसूं लागतो ).

**युव०**:—( एकदम उठून कंबरेच्या जंबियानें कंदर्पाच्या छातींत वार करून ) आणि तूं हें दगलबाजीचें प्रायश्चित्त भोग. आतां आपण दोघेही नरकाचा एकदमच रस्ता धरूं. ( मरतो ).

**कंदर्पः**—( वार झाल्यावर पडतां पडतां ) अरेरे—चांडाळानें अखेर डाव साधला. पण कांहीं हरकत नाहीं. माझा देश स्वतंत्र झाला—आतां मी सुखानें मरेन. ( शृगालास व त्याच्या लोकांस मारून कादंब तेजास्विनीस सोडवून कंदर्पाजवळ आणतात. जयजयकार. )

**तेज०**:—स्वातंत्र्यवीराचा विजय असो.—( पाहून ) कोण ? कंदर्प महाराज—

**कंदर्पः**—होय—मीच तो.—पण तेजास्विनी आधीं तें मातंगांचें पापी निशाण काढून हें कादंबांचें विजयी निशाण ध्वजासनावर उभार आणि कदंबदेश स्वतंत्र झाल्याचें जाहीर कर. ( तेजास्विनी तसें करते. जयजयकार. न्याया-

ध्यक्ष नागरिक प्र. क. ) झाला-माझा देश आज पुनः स्वतंत्र झाला-माझी प्रतिज्ञा पूर्ण झाली—मी पापमुक्त झालों. ( निशाणास अभिवादन करतो ).

**कंदर्पः**—न्यायाध्यक्ष-आणि देशबांधवहो, या आपल्या अपराधी राजास क्षमा करा. ( जयजयकार ) तेजास्विनी-तूंही मला क्षमा कर.

**तेज०:**—महाराज क्षमाच काय पण मीं आपलें सर्वस्वच आपल्या चरणीं या वेळीं अर्पण केलें आहे.—

**कंदर्पः**—काय ? तेजास्विनी आणि कंदर्पाला सर्वस्वदान !

**तेज०:**—होय. महाराज आपण आज कदंब देश स्वतंत्र केला आहे आणि कदंबास स्वतंत्र करणाऱ्या वीराला सर्वस्वदान करण्याची माझी प्रतिज्ञा आहे.

**कंदर्पः**—( आनंदून ) अहाहा ! मी भूमीवर आहें का स्वर्गांत आहें ? कदंब स्वतंत्र झाला-तेजास्विनी प्रसन्न झाली-तेजास्विनी-तेजास्विनी-दे-तुझा हात माझ्या हातांत दे-( हात पुढें करतो ).

**तेज०:**—हा घ्या.—( हात त्याच्या हातांत देऊं लागते ).—

**कंदर्प**—पण थांब— ( हात मागें घेतो ).

**तेज०:**—कां ?-महाराजांनीं हात मागें कां घेतला ?

**कंदर्पः**—तेजास्विनी, पहा, हें पहा माझें भवितव्य ( छाती उघडी करून जखम दाखवितो )-जखम जबर आहे-काळजाला जाऊन भिडली आहे.-माझें जीवित आतां घटका-अर्धघटकेपेक्षां अधिक नाहीं.-तेव्हां मी तुला जाणूनबुजून आपत्तींत कसा लोटूं ?

**तेज०:**—आपत्ति ?-नाहीं-महाराज मी आपले प्राण खर्ची घालीन-पण काळाला आपणावर अशी अचानक झपड घालूं देणार नाहीं.

**कंदर्पः**—छे-ही गोष्ट तुझ्या सामर्थ्याबाहेर आहे.

**तेज०:**—ईश्वराची तशीच इच्छा असेल तर तिलाही मी धैर्यानें सादर होईन. महाराज—

पद--एरी मैका पियाबिन्०--

संचिता सहावया । प्रबल हृदय प्रणयलीन ॥
सदा धरि धीरा । शोक हरी सारा ॥ ध्रु० ॥
॥ चाल ॥ सुखासि जाळुनिया जीविता स्मशान सदा ॥
करीत प्रीतिबळें सोडिना सुशील कदा ॥ सारा ॥ १ ॥

तेव्हां, महाराज, स्वातंत्र्यवीराचें देणें देऊन मला ऋणांतून मुक्त झालेंच पाहिजे. आपल्यासारख्या अद्वितीय स्वातंत्र्यवीराच्या नांवानें प्राप्त होणारें वैधव्य हें मंगल सौभाग्यच आहे. ( त्याच्या गळ्यांत माळ घालून त्याचें मस्तक मांडीवर घेते ).

**कंदर्पः**—परमेश्वर—तुम्हा सर्वांचें मंगल करो !— ( पुष्पवर्षाव ).

( पडदा पडतो. )




ॐ तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु !